# उत्कृष्ट इंग्रजी . . . . . . .

# लिहितां व बोलतां आलें पाहिजे

इंग्रजांचें राज्य गेलें तरीही आजच्या आणि उद्यांच्याही काळांत आपल्याला इंग्रजी भाषा सोडतां येणार नाहीं. हिंदी व मातृभाषेबरोबरच इंग्रजीची आवश्यकता आहे; इंग्रजी येत असेल तरच सुसंस्कृत नागरिकाला जगाशीं वैचारिक व व्यावहारिक संबंध ठेवतां येईल.

या दृष्टीने घरबसल्या सुलभ रीतीने इंग्रजी शिकण्यासाठीं श्री. एस्. जी. गुप्ते, एम्. ए. यांनीं "**दि मॅजेस्टिक इंग्लिश टीचर**" परिश्रमपूर्वक तयार केला आहे.

त्याचा उपयोग केल्यास इंग्रजी भाषा मुळीच कठिण नाहीं. थोडेसे मराठी शिकलेला मनुष्यही या टीचरच्या साहाय्यानें उत्कृष्ट इंग्रजी लिहूं व बोलूं शकेल.

यासाठीं.....................

| पानें २५६ |
|---|
| मूल्य दीड रुपया |

**दि**

**मॅजेस्टिक**

**इंग्लिश टीचर**

**या पुस्तकाचीच निवड योग्य ठरेल.**

# केवळ घरासाठीं !

" त्या 'कृष्णाभुवन' मध्यें एक सुरेख जागा रिकामी आहे. पहा प्रयत्न करून !" माझा मित्र म्हणाला.

अगदीं अमृततुल्य शब्द भासले मला ते ! गेले सहा महिने मी या मुंबईत जागेच्या शोधांत वणवण भटकत होतों; परंतु हे गोड शब्द माझ्या कानीं प्रथमच आले होते.

सध्या मी एका मित्राकडे रहात होतों. पण तोच पत्नीला घेऊन एका लहानशा खोलींत रहात होता, तिथें आम्ही 'दुष्काळांत तेरावा महिना' याप्रमाणें त्याला अधिक अडचणींत टाकायचं तरी किती दिवस ? मोरी-जवळच्या अरुंद व्हरांड्यांत मी, साडेपांच फूट उंचीचा, रुंद छातीचा भव्य पुरुष, किती कौशल्यानें अंग चोरून झोंपत असें, माझं मला माहीत ! खोलींत एक कोपरा 'स्वयंपाककोन' म्हणून होता, तिथे जेवायला बसलं कीं पान 'दिवाणखान्या'च्या सरहद्दीला भिडे ! स्वैंपाकाचीं भांडीं, भट्टीचे कपडे, कोळसे, सायकल, पुस्तकें, शेल्फ, ट्रंका !–साऱ्या हिंदुस्थानच्या अठरा पगड जातींप्रमाणें, संसारांत त्या अनेक जातीच्या चिजा, एकीचा महान् उपदेश आत्मसात् करून, एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून तिथें

नांदतांना पाहिल्या कीं, माझें तेथें राहाण्याचें धैर्य कसोटीला लावलें जाई !... आतां मात्र यापुढें मी तिथें रहाणं म्हणजे निर्दयपणाची शिकस्तच होणार होती !

कारण, जागेच्या अडचणीला न जुमानतां एक छोटासा ‘ पाहुणा ’ येण्याचा रंग दिसत होता लवकरच !

मूलच तें ! त्याला अमुक वेळीं, अमक्या ठिकाणीं, अडचण आहे हें समजून येणं कठीणच ! बरं, घराची तुमची अडचण लग्न झाल्यापासून सुरू होणार ! मग बाळराजांनीं काय जन्मभर या संसारांत यायचं नाहीं ?

कांहीं असो. त्या खोलीचें प्रसूतिगृह होणार हें निश्चित होतें. आमच्या छोट्या टेबलाच्या जागीं पाळणा बांधण्यांत येणार होता ! अन् मी शर्ट–कोट ठेवीत असलेला कोंपरा ‘ दुपटीं वाळत घालण्यासाटीं ’ रिझर्व होऊं पहात होता !

अशा परिस्थितींत चंबूगवाळें उचलणेंच योग्य नव्हतें काय ? म्हणूनच मला ते शब्द ऐकून माझ्या जन्मजन्मांतरींच्या आशा फळाला येण्याइतका आनंद झाला होता !

कृष्णाभुवन—खरोखरच माटुंग्याच्या शांत बाजूला, मोटारींची कटकट ऐकूं येणार नाहीं इतकं मेनरोडपासून दूर असं तें ‘ भुवन ’ होतं. बाहेरून पहातांच मी खूप झालों ! नक्षीदार लहानसं दुमजली घर, बाहेर बाग, कंपाउंड...बस् बस् ! आणखी काय पाहिजे ? जिथें चाळींतली भिकारडी खोलीहि मीं ‘ राजमहाल ’ मानली असती, तिथें अशा सुंदर जागेबद्दल मला केवढा आदर अन् आश्चर्य वाटूं लागेल, कल्पना करा !

एकदम एका दुष्ट शंकेनं मला पछाडालं ! इतकी चांगली जागा अन् मोकळी कशी ? कांहीं काळेंबेरं तर नाहीं ना इथें ? एखादा संपन्न, प्रथमवर तरुण लग्नावांचून राहिलेला दिसला कीं, जसे त्या तरुणाबद्दल, ‘ याला व्यंग तर नसेल ना कांहीं ? अविवाहित राहतो तेव्हां एखादी गोम तर नसेल ना या स्थळांत ? ’ इत्यादि शंकांचे कांटेकुटे मनाला टोचूं लागतात, तसेच मनांत कुतर्क उठूं लागले. ‘ हें घर ! भुताटकीनं तर हें रिकामं नसेल ?

का या घरांत राहणाऱ्या माणसाला आजार येतो असा अनुभव आहे ? कां बरें या अशा दिवसांत कृष्णाभुवनमध्यें जागा रिकामी राहिली ? '

मी घंटा वाजवतांच आंतून एक म्हातारे गृहस्थ बाहेर आले. कपाळाला शंभर आंठ्या ! कांहीं माणसांचे डोळे भारी कठोर असतात. तो कठोरपणा कमी वाटूनच कीं काय, जाड कांचांचा एक चष्मा चढवून स्वारी माझ्याकडे रोखून पहात होती ! नाक देवानें मूळचें बरें घडवलें असावें, परंतु नंतर कुणाचा धक्का लागून ते विकृत झाल्यासारखें रुंदट, वर उचललेलें असें बनलें कीं काय ब्रह्मदेवच जाणे ! ओठ कसे होते तें कळलें नाहीं, कारण पांढरट मिशांचे झुबके त्यांवर आक्रमण करीत होते.

त्या कुरूप काळ्या म्हाताऱ्यानें माझ्याकडे टक लावून म्हटलें, " कोण पाहिजे ? काय काम आहे ? "

मीं आशेनं म्हटलं, " इथें जागा रिकामी आहे ना ? "

तो कठोरपणें म्हणाला, " साठ रुपये भाडं पडेल ! दोन खोल्या आहेत. आहे तयारी ?—"

साठ रुपये भाडं ! अन् मला पगार दोनशें !...तरी पण अडला हरी कुणाचेहि पाय धरतोच कीं ! शिवाय पागडीचा प्रश्न नव्हता अजून उत्पन्न झालेला, हें काय थोडं झालं ?

मीं धीर धरून त्या म्हाताऱ्याला म्हटलं, " जागा दाखवा मला—"

तो रुक्षपणें म्हणाला, " जागा पहायच्या पूर्वी एक गोष्ट सांगा. तुमचं लग्न झालं आहे काय ? "

मला आठवलं, कित्येक ठिकाणीं मीं ऐकलं होतं कीं, मालकांच्या तरुण मुलींबाळींवर भाडेकरू डोळा ठेवतात, म्हणून पुष्कळ पेन्शनर अविवाहित माणसांना जागा देत नाहींत ! पण मी तसा सुरक्षित होतों...अचलेशीं माझं सहा महिन्यांपूर्वी लग्न झालं होतं,—अन् हाय हाय—केवळ जागेच्या अडचणीनं, विवाहित स्थितींतहि आम्ही ' एकलेपणाची आग ' सोशीत होतों. अचला लग्न न झालेल्या पोरीप्रमाणें माहेरीं अचल राहिली होती ! ती तिकडे तडफडत होती,—इकडे मी ! मध्यें केवळ कमळाचं पान

असल्यानें चक्रवाकांचा विरह झाल्याची कथा रोज मी खिन्नपणानं आठ-वीत होतों. माझं सत्तेचं घर मिरजेला होतं ! हिच्या माहेरचा वाडा राम-दुर्गला होता...पण आम्ही दोघे ' घरंदाज ' लोक जागा नाहीं म्हणून असे विरहानं करपून जात होतों गेले सहा महिने ! माझ्या मनांत हे विचार येऊन मी जरा स्तब्ध झालों. मी मोठ्यानं सांगून टाकण्याच्या बेतांत होतों,—

' तुम्ही निर्धास्त रहा ! मी त्या दृष्टीनं निरुपद्रवी बनलों आहें. दांत पाडलेल्या सापाप्रमाणें मी आतां एका गारुड्याच्या ताब्यांत आहें. तुमच्या मुलींना मी दंश नाहीं करणार. '

तेवढ्यांत त्या पांढऱ्या मिशांचे झुबके वरखालीं झाले, आणि घोगरे शब्द त्यांतून उमटूं लागले,

" विवाहित असाल तर चालूं लागा ! मी विवाहितांना जागा देणार नाहीं. विवाहित म्हटलं कीं, एकदोन व्रात्य कारटीं असायचींच ! तीं बागेचा विध्वंस करायचीं ! मागल्या हौदांत डुंबायचीं ! अन् बायका-बायकांचीं भांडणं तर रोज होणारच ! नकोच ते ! विवाहितांना घर देणार नाहीं; शपथ घेतलीय् मीं ! "

हाय हाय ! माझी गोड अचला !...तिच्याशीं लग्न केल्याबद्दल भाग्य-वान समजून चालणारा मी,—माझा केवढा मनोभंग झाला त्या दुष्ट शब्दांनीं ! आमचं प्रेमाचं बाळ होईल तो दिवस महत्‌भाग्याचा मानणारीं आम्ही प्रेमळ माणसं, अन् हा थेरडा व्रात्य कार्टीं म्हणून संभावना करतो लोकांच्या गोजिरवाण्या छब्ड्यांची ! अन् अचलेसारखी गोड तरुणी... ती भांडणं करील ? छे छे !...

मी हादरलों. म्हाताऱ्यानें कडूपणें हंसून म्हटलें,

" तुम्ही विवाहित आहांतसं दिसतं. चला तर परत ! " तें दार बंद होऊं लागलं. झुबकेदार मिशा निष्ठुरपणें पलिकडे वळल्या. म्हाताऱ्यानं पाठ फिरवली या अभाग्याकडे !

जणुं स्वर्गाचं दार एखाद्या पाप्याला बंद व्हावं तसं मला तें बंद होणारं दार पाहून वाटूं लागलं...हीही जागा जाणार? अन् मीं कुठं रहायचं मग? पाळणा–खेळणीं,–त्यांत मी दैवाचें एक ' खेळणें ' होऊन राहूं ? बाळाच्या खुळखुळ्याप्रमाणें परत व्हरांड्यांत अंगाचा ' खुळखुळा ' करीत दारच्या कुत्र्याप्रमाणें मित्राच्या दारीं पडून राहू ? अशक्य ! मीं एकदम म्हटलं,

" अहो, असं काय करतां अगदीं ? मी अविवाहितच आहें ! साठ रुपये देतों,—आत्तां देतों. पण मला राहूं द्या. "

तो म्हातारा हंसला. त्याला थोडे तंबाखूनें तांबडे झालेले दांत आहेत हें मला आतांच समजलं ! त्याचा स्वर एकाएकीं मंजुळ झाला. खरखरून वाजणाऱ्या पत्र्यानें जसे शहारे येतात, तसा त्याचा आवाज एवढा वेळ होता, तो घंटेप्रमाणें सौम्य कां झाला बरं ?

" तर मग आंत या, घर पहा. तुमचं आमचं पटलं, तर भाडंदेखील मी कमी करीन थोडं. " तो घर दाखवूं लागला.

मी खूष झालों ! दोन आटोपशीर, हवाशीर, स्वच्छ, सुंदर खोल्या ! लाईट होता, गॅसच्या चुली होत्या...स्वच्छ फरशी ! किती सुरेख जागा...! परंतु हाय हाय ! माझ्या अचलेला इथें आणायचं नाहीं !...मला प्रिय पत्नी आहे, ती गोंडस, सुंदर आहे, हें विसरून वागायचं ! लग्न होऊनहि ही ब्रह्मचर्याश्रमाची दीक्षा चालू ठेवायची ! केवढं कठोर व्रत ते–! अरेरे ! तापल्या तव्यावर हा दुष्ट घरमालक मला उभं करीत होता,—अशा मनाला वेदना होत होत्या ! पण आशा अमर आहे. ती कानांत सांगत होती, ' एखाद्या अविवाहित मित्राला ही जागा बदल्यांत देऊन ती त्याची जागा तुला कदाचित् मिळेलही. हें घर हातचं सोडूं नको ! तूर्त एकटा ! त्यांत काय आहे ? जीवन हेंहि युद्ध म्हणतातच...युद्धांत सैनिकाला एकट्यानं पत्नीपासून दूर राहून झुंजावं लागत नाहीं का ? शिवाय एकटं राहण्यांत नुकसान काय ? दोन पैसे गांठीं राहतील, तब्बेत ठणठणीत राहील. विरहानं प्रीतिवेल जोमदार होईल अन् रेशनचीं धान्यं कोठून कशीं मिळवावीं ही कटकटही करावी लागणार नाहीं. खाणावळींत

चाळीस रुपये महिना फेकून द्यावे, तांबडी भाकरी, आंबूस दह्याची वाटी, तिखट पाले खावे, मन मानेल तेव्हां हॉटेलांत जाऊन बटाटेवडे, भजीं खातां येतातच ! हवा तेव्हां सिनेमा आहे, भेळ आहे, नाटकं आहेत, हॉटेलं आहेत ! या स्वच्छंदपणाला तूं पारखा झाला असतास बायकोमुळें— तेंही मनांत आण...'

मनाच्या या सांगण्यांतलं स्वारस्य पटत होतं खरं, पण त्यापेक्षांहि अचलेचा चेहरा नजरेसमोर येऊन चलबिचल करीत होता. कांहीं असो; भाडं मोजून दिलं अन् कुलूप ठोकलं माझं तिथें, तेव्हां मला इतका आनंद झाला कीं पाकिस्तान मिळवल्यानंतर जिनांना झालेला आनंद त्याहून कमीच ठरला असता तुलनेंत !

मित्राला मी जेवतांना सर्व हकीकत सांगितली. बापड्यानं सुटकेचा एक दीर्घ श्वास टाकलेला मीं पाहिला. खरोखर प्रपंच—त्यांतून मुंबईतल्या वीतभर जागेंत मांडलेला प्रपंचाचा पसारा म्हणजे एक कठीण कसोटी आहे जीवनाची ! मित्र, नातेवाईक, ऋणानुबंधी सगळ्यांना तोडूनही टाकतां येत नाहीं फट्‌दिशीं ! गृहस्थधर्माला तिलांजली देतां येत नाहीं व जागा मात्र दोघांना पुरेल एवढ्या बिळाएवढी ! माझं रहाणं त्याही स्थितींत त्याही सोशिक दाम्पत्यानं कसं सहन केलेलं होतं, त्याचीच तो उसासा ही मूक साक्ष होती !

मात्र अविवाहितपणाची अट कां, हें माझा मित्र ओळखूं शकेना. शेवटीं तो म्हणाला, "कर झालं वर्षभर सोंग लग्न न झाल्याचं ! आणूं नकोस अचलावहिनीला इतक्यांत ! तोंपर्यंत एकादा वशीकरण ताईत मागवून त्या म्हाताऱ्याला वश करण्याचं तंत्र जुळवायला पाहिजे तुला, तपश्चर्या केली पाहिजे !"

कडू कारल्याचे काप वहिनींनीं माझ्यापुढें तळून ठेवले होते, ते फार खमंग लागत असूनही मीं कडवट चेहरा करून म्हटलं, "किती कडू जहर—!"

" माझे शब्द कीं काय ? " मित्रानें हंसून जिव्हारीं जखम केली ! मी ओठ आवळून विचार करूं लागलों,—ही काय विक्षिप्त अट ?

*   *   *

ओहो, वाहवा ! वाहवा ! नुसतं लग्न झालेलं आहे हें विसरून गेलं, तर माणसाला इतका मान मिळतो, इतकी आपुलकी प्राप्त होते, इतका घरोबा उत्पन्न होतो, हें पाहून मला अचलाही तुच्छ वाटायला लागली ! आमचे घरमालक भय्यासाहेब शेंडे यांचा पूर्वीचा उग्रपणा कोठेंतरी पळून गेला होता त्यांच्या त्या पांढरट मिशांच्या झुबक्यांतून आतां ! ताम्हन फरशीवर पडलें कीं जसा आवाज होतो तसा हास्याचा कठोर ( माझ्या दृष्टीनें ) ध्वनी उमटूं लागला होता...दुसरेच दिवशीं, माझ्या खाण्यापिण्याची चौकशी करून भय्यासाहेब शेंड्यांनीं मला चहाला बोलावलें. शेंड्यांची खुषीनं हालणारी शेंडी पाहून मला भयच वाटायला लागलं ! आहे तरी काय म्हाताऱ्याच्या मनांत ?

" हें आमचं कुटुंब. " ते म्हणाले. मीं वर पाहिलं. काळ्या रंगांतून भुवयांच्या रेषाही नीटशा समजत नव्हत्या. डोळे अत्यंत मंद. केस कसे होते नीट लक्षांत येईना; कारण कपाळ संपलं कुठें अन् डोकं सुरू कुठें झालें हें काळ्या वर्णांतून माझ्या बुद्धीला चटकन् आकलन होईना...इतकं काळं मनुष्य मी पांढरपेशांत प्रथमच पहात होतों, यांत शंका नाहीं.

तेवढ्यांत म्हातारबोवा उद्गारले,

" बरं झालं तुम्ही आलांत ते ! उद्यां कृष्णा येणार. सोबत होईल चांगली. कृष्णालाही एकटंएकटंच वाटत होतं आजवेरी—"

' कृष्णा ! या जोडप्याचा एकुलता एक मुलगा असेल ! ' मीं मनांत म्हटलं. नंतर मोठ्यानं विचारलं, " त्याचं शिक्षण किती झालं आहे ? "

" ज्युनिअरला आहे...फार फार हुषार आहे. उद्यां पहालच तुम्ही ! स्नेह जमेल तुमचा. हो, तुम्ही कुणालाही आवडाल असेच आहांत अमरेंद्र ! "

मी भ्रमिष्टासारखा पाहूं लागलों. कडक स्वभावाचीं हेकेखोर माणसं स्तुती करायला लागलीं तर तेंही कांहीं अनिष्टच वाटूं लागतं. तसंच मला तें सारं भाषण एखाद्या कटासारखं अशुभ वाटलं. अस्वस्थ मनानं मी ऑफिसांत गेलों.

* * *

ह्या अचलेला म्हणावं तरी काय आतां ?

म्हणे मैत्रिणीबरोबर मुंबईला येणार ! चार दिवस तिच्याकडे राहणार ! अन् मग खुद्द हुजूर स्वारीची गांठ घेणार ! लिहिते कशी ?—' खरंच घर मिळत नाहीं, का स्वारी कुणाच्या नादीं लागली आहे अन् मला मुद्दाम दूर ठेवते आहे ? ( हा आमच्यावरचा प्रिय पत्नीचा विश्वास ! ) समक्ष पहाणार.'

या बायकांना उपद्व्याप फार ! मित्राच्या बायकोनं तिला परभारें पत्र लिहून कळवलं होतं कीं, ' तुझ्या नवऱ्याला छान घर मिळालंय् ' म्हणून ! आतां पहा ! मीं लिहिलं असतं कीं माझ्या बायकोला सगळं ! पण छे ! रिकामे उपद्व्याप करायला पाहिजेत ना बायकांना !

अचलेकडून कचेरीच्या पत्त्यावर आलेल्या पत्राच्या ओळी मी पुन्हां पुन्हां वाचीत होतों,

"...मला कळवलंसुद्धां नाहीं घर मिळाल्याचं. इश्श ! म्हटलं आतां तरी न्याल ! पण अजून कांहीं आमची दया येत नाहीं म्हणायची ! आम्ही मेलं हाल काढीत, फोटोला फुलं वहात, विरहानं जीव व्याकुळ करीत मानसपूजा करीत बसावं. तरुण जोडपीं पाहिलीं, मैत्रिणींचा पतीशीं हास्य-विनोद पाहिला कीं तडफडावं, अन् तुम्ही मात्र सुरेख घरांत एकट्यानं रहावं ! हेंच का तें प्रेम आमच्यावर ? मला न्या गडे ! आपण फुटपाथवर-सुद्धां राहूं ! पण मला आतां दूर राहायचं नाहीं. हें काय बरं ? मीच तिथें,—हो, एक संधि साधून येणार आहें आठचार दिवस. तिथें एक माझी मैत्रीण आहे जुनी, हुजुरपागेंतली. तिच्या आग्रहावरून येणार

आहें, तेव्हां येईन तुमच्या पायांचं दर्शन घ्यायला ! कुठें सांपडलां नाहींत, तर ऑफिसांत येईन. तेव्हां—सावधान !

तुमची नावडती होऊं लागलेली,

अचला."

'इकडे आमचे हाल आम्हांला ठाऊक ! अन् प्रिय पत्नीनं त्यावर हे वाग्बाण सोडले होते ! अचला माझी नावडती ? माझं प्रेम नाहीं ? अन् म्हणे फूटपाथवर राहूं ! ही काय कादंबरी आहे, का सिनेमा ? फूटपाथवर घेऊन बसायचं काय हिला रात्रंदिवस ? या अलीकडच्या तरुणींना कांहीं पोंचच उरला नाहीं ! स्वतः येणार म्हणे ! अन् आमच्या बुढ्या घर-मालकाला जर का कळलं, मी लग्न करण्याचा गुन्हा केलाय म्हणून तर सुंदर घराची आशाही चुरगळून जाणार होती ! किती मूर्ख आहे ही अचला !' मनाशीं पुटपुटत रागानें मी बसस्टॅंडवर तपश्चर्या करीत उभा होतों. जिथे तिथें क्यू ! माझा नंबर पुढचे वीस संपतील तेव्हां येणार होता. चिडून विचाराच्या भरांत माझा हात पाठीमागच्या माणसाला लागला— "माफ करा" मीं वळून म्हटलं. अन् केवढं आश्चर्य ! माणसाच्या या क्षुद्र जीवनांतही केव्हां केव्हां अद्भुत योगायोग येतात याची मला साक्ष परस्पर माझा बाळमित्र सदोबा ( सद्याच म्हणत होतों मी ) कुळकर्णी माझा पाठीराखा बंधु होऊन बसस्टॅंडवरदेखील या अफाट मुंबईत माझ्या रक्षणाला सिद्ध होता !

"सदू, सद्या ! सदाशिव—! तूं...तुम्ही...आपण !"

माझ्या गोंधळलेल्या मुद्रेकडे पहात सदू हंसला अन् म्हणाला, "मीच तो ! चल आतां, गिरगांवांत जातोंच आहों, तर जाऊं एखाद्या सिनेमाला ! मनसोक्त बोलूं तरी !"

अन् खरंच, किती बोललों आम्ही ! नशिबानं लांकूड—कोळशाच्या व्यापारानं त्याला चांगला हात दिला होता. दिसायला गबाळग्रंथी, चपटें नाक, लांबट कान, रडवे ओंठ अन् काळा वाण यामुळं लहानपणीं अन् आतांसुद्धां विचित्र, कुरूप दिसणारा पण अंतःकरणानं भावडा, साधा,

सदाशिव भेटल्यानं माझं हृदय मोकळं झालं. खूप वर्षांनीं भेटलेलीं माणसं ! घरगुती गोष्टी निघणारच. मी खुषींत येऊन अचलेबद्दल सांगूं लागलों तेव्हां त्याचे डोळे ओलसर झाले. तो घोगऱ्या स्वरांत उद्गारला, "अमरेंद्र, त्या बाबतींत मी मात्र दुर्दैवी ठरलों आहें. बायको सुरेख होती,—एक छोटी बेबी पण आहे.—पण ती भारी नाजूक होती. क्षय झाला तिला. वैभव मिळवलं, पण ती गेली. नशीब म्हणायचं !"

"मग पुन्हां लग्न ?"

"लग्न ? आहे बेत ! पुरुषमाणूस एकटा राहणार किती दिवस ? दमून भागून आलं कीं हक्काचं माणूस घरीं हवंसं वाटतं. मात्र आतां करीन ती प्रकृतीनं दणकट करणार आहें. सुरेख नसेना का ?"

'माझी अचला तर मग प्रकृतीनंहि मस्त आहे न् रूपानंही गोड आहे' हें वाक्य ओठांत घुटमळत असलेलं परतवून मी त्याचा निरोप घेतला. सदू 'पत्नी नाहीं' म्हणून विधुर अन् मी ? 'पत्नी असूनहि विवाहित ब्रह्मचारी'...समदुःखी होतों आम्ही ! मीं त्याच्याइतकी माझीही कींव करीत घराकडे आलों.

घरीं आलों तों व्हरांड्यांत अदमासें पंचवीस वर्षांची एक स्त्री मीं पाहिली. बांधा खूपच लठ्ठ अन् गोल पातळ ह्यामुळं मोठ्याशा सिलिंडरचीच आठवण आली. केस अगदीं बारीक, छोटेसे, त्यांना एक भलें मोठें गंगावन अर्ध्या वेणींत जोडलें होते. त्यामुळें बेडूक गिळलेल्या सापाप्रमाणें वेणी मध्येंच फुगली होती !

भय्यासाहेबांप्रमाणें बसकट नाक, वर्ण काळा, मोठे दांत ओठांतून बाहेर डोकावून जगाची मजा पहायला गॅलेरींत मुलं पुढें येऊन बसतात, त्याप्रमाणें टपून बसले होते जसे ! कुब्जा तरी बरी, अशा रूपाची ती स्त्री पाहून मला भूकंपांत सांपडल्याप्रमाणें हादरा बसला...तोंच दाराआड भय्या-साहेबांची शेंडी हालते आहेसं भासून मीं वर पाहिलं. हो ! खरंच. सफेद होऊं लागलेल्या मिशांतून तांबडे दांत दिसत होते ! शेंडे पुढें आले न् म्हणाले,

" हीच आमची एकुलती एक कन्या, कृष्णा बरं का ! मावशीकडे गेली होती पुण्याला, आतां आली ! सगळं येतं बरं हिला ! पोहायला, सायकलीवर बसायला, मोटरसुद्धां चालवायला येते ! पेटी वाजवते...सतार-सुद्धां वाजवते...छान संसार करील तुमचा ! "

भूकंपांतला लाव्हा रस पडून मी भाजतों आहेसं मला वाटलं एकदम !

" काय, माझा संसार ?—" मी ओरडलों !

" बरं, बरं ! आतांच काय ? पण अमरेंद्र ! जेवायला आज इथंच थांबायचं बरं का ! हिच्या मैत्रिणी आल्या आहेत. गेल्या आहेत जरा फिरायला. रात्रीं पाठीमागच्या गच्चीवर चांदण्यांतली अंगतपंगत आहे. हां, काढा ना कपडे ! अहो, ऐकलंत का ? अमरेंद्र आले, जरा फराळाचं पाठवा...अहो, आतां ते आपलेच व्हायचे. समजलं ना ? कृष्णा, जा बाळ, घेऊन ये पलीकडच्या खोलींत चहा ! दमून आलेयत् आपले अमरेंद्र. "

म्हातारडा ' ही ही ' करून हंसत बोलत होता. आतां त्या दुष्टाचा कावा माझ्या लक्षांत आला. तें रिकामें घर ' अविवाहिता ' ला कां द्यायचं याचा मला आतां बोध झाला चांगला. मला अशी चीड आली...वाटलं, आपण कुठल्या तरी तळघरांत अंधेऱ्या जागीं खोल खोल ढकलले जात आहोंत. मग एकदम असा भास झाला कीं, वरून विमानांतून सैनिक हातबॉंब माझ्या डोक्यावर टाकतो आहे...अन् मी दचकून वर पहातों तों, तो दुष्ट वैमानिक थेट भय्यासाहेबांसारखा दिसत होता.

ते तीन तास मी कसे काढले, परमेश्वर जाणे ! भय्यासाहेब सारखे मला ' कृष्ण-लीला ' ऐकवीत होते. त्यांचें पंचवीसतीस हजारांचें उत्पन्न कृष्णाला ऊर्फ जांवयाला—अर्थात् या दुर्दैवी अमरेंद्राला मिळणार होतें. तो सुंदर बंगलाहि मला बक्षीसपत्र करून मिळणार होता. म्हातारबुवांचं असलं नसलं सर्व, अमरेंद्राचं होणार होतं !—केवळ मी देखणा, सशक्त, उमदा अन् ' अविवाहित ' होतों म्हणून. एकच अग्निदिव्य हवं होतं ह्यासाठीं ! जन्माचा ' कृष्ण ' पक्ष स्वीकारायचा—विषाचा एकच घोट घ्यायचा.

बस्...! या भयंकर शासनाला मी, केवळ 'अविवाहित' असण्याचा गुन्हा कबूल केल्यानं, पात्र ठरलों होतों. हतबुद्ध होऊन मी ऐकत होतों... लाडूचे गोड घांस मला मापग्रेनच्या गोळीप्रमाणें कडू लागत होते...लिंबाचें मधुर सरबत जणुं कडूनिंबाच्या पाल्याच्या रसासारखें भासत होतें. शंकरपाळे? छे, माझ्या दीन आशेचीं छकलंच तीं! कांटेकडबोळीं कसलीं? कांटे असलेलीं, जिवाची कोंडी करणारीं भयंकर चाकें होतीं!

सर्वांवर कळस म्हणजे मिस् कृष्णाबाई हंसून बोलत होत्या, माझ्याकडे पाहून खूप होऊन मान डोलवीत होत्या! वाघाच्या तावडींत सांपडलेल्या, शिकाऱ्यानं बांधलेल्या जनावराप्रमाणें मी दीन झालों होतों. माझ्या रूप-गुणाचा, भरदार देहाचा अभिमान वितळून चालला होता... 'हाय हाय! अचल!'

मीं कसंबसं म्हटलं, "प-पण-माझं लग्न ठरलंय्—"

"तर मग उद्यां घर सोडा!"

त्या कठोर आवाजानं मी दचकलों. पुन्हां घर नाहीं. या अफाट मुंबईत मी कुठें भटकावें? काय थेरड्यानं पेंच घातला होता!... 'अशुभस्य कालहरणम्' या दृष्टीनं मीं म्हटलं, "रागावूं नका. या जन्माच्या गोष्टी. विचार करूं आपण आठचार दिवस."

"हां! हें कबूल. कृष्णा, आठ दिवस यांची व्यवस्था उत्तम ठेवायचं काम तुझं, बरं का!" तो मुत्सद्दी बोलला.

रात्र झाली. गच्चींतून, पन्नाससाठ चिमण्या ओरडतात तसला आवाज येत होता. बहुतेक मैत्रिणींचा तांडा आला होता जेवायला! दारांतून कुणी मृदु स्वरांत म्हटलं,

"चला ना! वेळ झाली. भय्यासाहेब बोलावताहेत तुम्हांला पाहुणे!" मी पाठमोरा बसलों होतों डोकें धरून-तो ताडकन् त्या मंजुळ स्वरानें दचकून उभा राहिलों...अन् डोळे फाडून त्या गोड बोलणाऱ्या व्यक्तीकडे पाहूं लागलों!...मी स्वप्नांत तर नव्हतों? माझी अचला-अचलाच ती!! पण इथें कशी? अन् मी 'भावी जांवई' म्हणून तो दुष्ट थेरडा साऱ्यांना

आज तें सुनावणार होता...अन् तेंही अचलेसमोर ! काय ही दुर्दैवाची घटना !...

मीं भांबावून म्हटलं, "तूं ? तूं इथं कशी ?"

"हें पहा ! तुम्हांला बायको नकोशी झाली म्हणून मी कांहीं तुमचा द्वेष नाहीं करणार ! आम्ही बायका वेड्या असतों म्हणून येतो धांवत तुम्ही असाल तिथें, पण तुम्हांला कुठें आमची दया येतेय् ? घर मिळूनहि मला कळवलं नाहीं !...माझी कटकट वाटते, दुसरं काय ? ठीक आहे—छान !"

बायको प्रेमळ असली तरी ती चिडली म्हणजे किती कठोर बोलते, हें सगळ्यांना माहीत आहे ! म्हणजे हा न्याय बघा ! माझा जीव चालला आहे हिच्यासाठीं अन् वर आम्हांला हा शालजोडींतला आहेर मिळावा ! मीं करुण वाणीनं म्हटलें, "मी फार फार संकटात आहें...अचल ! आज तूं साऱ्यांची नजर चुकवून रात्रीं इथे ये...मग सगळ सागेन."

फणकाऱ्यानं बाईसाहेब म्हणाल्या, "रात्रीं ? इथें ? अन् नजर चुकवून ? माफ करा. तुम्ही अविवाहितपणाचं ढोंग करून त्या कृष्णेशीं पैशासाठीं लग्न करायला तयार झालांत. भय्यासाहेबाकडून मला आतांच ही बातमी कळली. तरी मी रात्रीं तुमच्या ब्रह्मचर्याश्रमांत येऊं ? एका पवित्र महात्म्याला तपोभंग करायला लावूं ? नाहीं, नाहीं...पण चला जेवायला ! अन् जर माझी कांहीं किंमत असेल तर ओळख दाखवूं नका आपली ! हो, उगीच मैत्रिणींत नको आणखी आमची फजिती !"

हाय हाय ! हे सुरे मारून माझी प्राणप्रिया पाठ वळवून निघून गेली...' पंजरीं व्याघ्र सांपडे ! बायकामुळें मारिती खडे ' म्हणतातच कीं ! मी खोड्यांत अडकलों होतो; मग तिनं तरी कां छळूं नये ? घर तरी जातं, नाहीं तर सुंदर बायको रागावून जाते. काय करूं ? काय करूं ?...

गच्चींतलं तें जेवण फार सुग्रास होतं. पण माझं सारं लक्ष अचलेकडे होतं. काय पण नाटक चाललं होतं बाईसाहेबांचं ! माझ्याकडे पाहून हंसून मधूनमधून म्हणत होत्या,

'पाहुणे, अहो, तुम्ही घरजांवई होणार ! नीट जेवा हो !'

'पाहुणे, साखरभात घ्या कीं जरा ! आतांपासूनच नका अस्वस्थ होऊं–साखरेचा तोटा नाहीं सध्यां भय्यासाहेबांना.'

'पाहुणे, जवळ जवळ ठरलं म्हणे. खरं का ? काय ग किशे ! पुण्याला सांगितलंस नाहीं मुळींच—'

—इत्यादि बडबड ऐकून असं वाटलं, चांगलं तांब्याभर पाणी ओतावं डोक्यावर. नाहीं तर फुलपात्र फेंकून मारावं. पण चुरमुरे ऊर्फ भात खात बसणं प्राप्त होतं.

रात्रीं झोंप येईना. पलीकडे एका भिंतीआड प्रियपत्नी झोंपलेली...! चार महिने दूर राहिलेला मी तरुण पती...! विरहदुःखाचे प्याले पिऊन निराशेनें सुस्कारे सोडणारा अमरेंद्र ! हाय ! हाय ! काय हे दुर्दैवाचे खेळ...

शेवटीं पाठीमागचें दार उघडून बागेंत गेलों अन् द्राक्षांच्या कुंजाखालीं बांकावर पडून राहिलो.

तों समोरून एक शुभ्रवस्त्रधारी स्त्री येऊं लागली.

ओहो ! असा रोमहर्षक प्रसंग कोठल्या कादंबरींतसुद्धां नसेल ! ती माझी प्रिय पत्नी अचला होती...प्रियतम अमरेंद्राला भेटायला ती अभिसारिका येत होती ! आल्याबरोबर गळ्यांत हात टाकून तिनं हुंदके देत प्रश्नावर प्रश्न विचारले, "अमर, इतके कसे हो निष्ठुर झालांत ? एक गोळी कां घालत नाहीं मला ह्यापेक्षां ? सहज मैत्रिणीकडे म्हणून आलें तर हा काय दैवभोग उभा राहिला ? मला कसे हो विसरलांत अगदीं ?"

एकंदरींत अशाच ह्या बायका रडायच्या ! त्या भेटीचं फार वर्णन देणं बरं नाहीं. (कोणी अश्लीलमार्तंड गोष्ट फाडून टाकायचा नाहीं तर !) पण जातांना पुन्हां याच वेळीं बागेंत दुसरे दिवशीं भेटण्याचंहि वचन देऊन व एक मोठा कट करून, बेत ठरवून ती त्रिभुवनसुंदरी तेथून निघून गेली.

बेत तर फार नामी होता, घरहि रहावें व बायकोहि आणतां येईल असा तो बेत होता. त्याप्रमाणं मीं सदोबाला जाऊन भेटलों. सगळं सांगितलं. त्यानंही आपल्या राहत्या जागेंत 'महिना दोन महिने देखील रहा' म्हणून

कबूल केलं. बेताला अनुकूल करायसाठीं मी त्याला बिऱ्हाडीं घेऊन आलों. दोन दिवस त्याची छोकरी त्याची आई संभाळणार होती.

त्या दिवशीं भय्यासाहेबांची व सदोबाची ओळख झाली. सदोबा पैसेवाला आहे ही गोष्ट मीं पुन्हा पुन्हा खुलवून सांगितली. त्याला दुसरं लग्न करायचं आहे, पण मुलगी कुलशीलाची, अब्रूदार घराण्याची अन् घट्टीकट्टी हवी, हेंही सांगितलं. तेव्हां त्यांच्या पांढरट मिशांतून हास्य निसटूं लागलं. ते सदोबाला म्हणाले, "यांच्याशीं कृष्णाचं लग्न ठरलं नसतं तर मी तुम्हांला खास पोरगी दिली असती!..." त्यावर मी अन् सदोबा डोळे मिचकावून हंसलों तें त्यांच्या लक्षांत आलं नाहीं.

पण रात्रीं एक 'भयंकर' प्रकार घडला. मध्यरात्रीं नाजूक पावलांनीं अचला ठरल्याप्रमाणें कुंजांत आली. मीं तिला हृदयाशीं धरलं तोंच पाठीमागच्या झाडीची हालचाल झाली अन् भय्यासाहेब नि सदोबा बाहेर आले. बिळांतून ससे बाहेर यावे तसे ते मला भासले. भय्यासाहेब ओरडून म्हणाले,

"शिव शिव! काय हें मी पहातों! अन् ही—ही चांगली लग्न झालेली कुलीन पोरटी! अन् या अशा अधम माणसाला मी माझी सोन्यासारखी कृष्णा देणार होतों! अरे अरे!...या सदोबांनीं जागं करून मला हा पाजीपणा सांगितला तेव्हां मला खरंहि वाटलं नाहीं. पण पहातों तों—छे! नको तें पहाणं! नीचा, माझ्या किशीचा अन् माझा केसानं गळा कापीत होतास अं? असा दुर्वर्तनी, पाजी माणूस माझा जांवई?—शक्य नाहीं!"

हे शब्द ऐकतांच माझ्या पायांतल्या मणामणाच्या अदृश्य बेड्याच जणूं निखळून तुटून पडल्याचा मला आनंद झाला!...पंधरा ऑगस्टला राष्ट्र दास्यमुक्त झालं; मीहि त्या कृष्ण—संकटांतून स्वतंत्र झालों आज!... भय्यासाहेब आडोशांतून पुढें येऊन गरजले,

" उद्यांच्या उद्यां घर सोडून चालते व्हा...ए, अचले, तूंही निघून जा परत! मी माझी किशी या सद्गुणी, श्रीमान् सदोबांनाच देणार आहें. समजलांत?—"

दूर कुठें तरी दिवाळीचे फटाकडे उडत होते व बागेंत त्यांचा आवाज घुमत होता. भय्यासाहेबांकडे आम्ही हतबुद्ध झाल्यासारखे पहात होतों. सदोबा हळूच म्हणाले,

" एका अपराधाची क्षमा असेल, एक मागणी कबूल असेल, तर मी कृष्णाबाईशीं आनंदानं विवाह करीन–बिनहुंड्यानं ! "

" बोला, बोला,–तुमचा कसला अपराध ? काय हवं तें सांगा. "

सदोबा हात जोडून म्हणाला,

" तर मग माझा मित्र अमरेंद्र याला याच घरांत राहूं द्या ! "

" नाहीं–नाहीं. हा पाजी माणूस––"

" पाजी ! माझा मित्र पाजी कसा असेल भय्यासाहेब ? अहो, याला घर मिळत नव्हतं म्हणून यानं ' अविवाहित ' असल्याचं सांगितलं, पण खरं पहाल तर याचं सहा महिन्यांपूर्वी या अचलेशींच लग्न झालंय ! विरही जीव बापडे ! सहा महिन्यांनीं आपल्या लताकुंजांत भेटले ! हा पाजी-पणा नाहीं. घर नाहीं म्हणून बिचारा माझा मित्र कपट करीत होता. जाऊं द्या ! प्रेमांत, लग्नांत अन् युद्धांत सारं क्षम्य आहे ना ? राहूं द्या या दोघांना इथें. मला कांहीं घराची जरूर नाहीं. शिवाजी पार्कला माझा बंगला आहे नवा. तेथें मी कृष्णाबाईना नेईन. तेव्हां यांना राहूं द्या तुमच्या सोबत. का मी सोबत नेऊं माझ्या घरीं ? "

बावळट सदोबा इतकं परिणामकारक व्याख्यान देईल ही मला कल्पनाच नव्हती. तो कॉंग्रेस मंत्रिमंडळांतदेखील काम करील असा चतुर होता हें पाहून आदरानं माझं मन गोठून गेलं ! अचलेची तर चतुरपणानं मनं जिंकण्याची कमालच म्हटली पाहिजे ! चटकन् पुढे होऊन भय्यासाहेबांना नमस्कार करीत ती म्हणाली, " कृष्णाताई जाणार दुसऱ्या घरीं ! मीहि तुम्हांला लेकीसारखी आहें. मी जवळ राहून करीन तुमची सेवाचाकरी ! आम्हांला राहूं द्या ना ! सहा महिने दूर आहोंत; लेकीची कींव करा ना भय्यासाहेब ! आशीर्वाद द्या ! हे तसे फाऽऽर चांगले आहेत हो ! पण केवळ घरासाठीं––! "

त्यांची चर्या सौम्य झाली. डोळे निवळले. तांबडे दांत मिशांच्या दाटींतून डोकावूं लागले. ते घोगऱ्या आवाजांत म्हणाले,

" अरे ! तुम्ही सारेच लबाड आहांत, दुसरं काय ! पण आज दहा वर्षं हुडकतां हुडकतां किशीला आज ' घर ' मिळालं; तेव्हां तुम्हांलाहि त्या आनंदांत घर मिळूं द्यावं असं मीं ठरवलं आहे. तूं लेक अन् जांवयाच्या सोंगानं घरांत घुसलेला हा घरजांवई अमरेंद्र ! सुखांत रहा बरं इथें नेहमीं !"

काय ? स्वराज्यप्राप्तीचा आनंद याहून मोठा असेल ? छे: ! मला नाहीं वाटत !

—*—

# मधल्या भिंती !

जॉर्जेट्चें निळें पातळ आणि आकाशी रंगाचा कडक ऑर्गंडीचा पोलका, असा मनपसंत पोषाख झाल्यानं कांचन आज फार खुषींत होती अगदीं ! तिच्या खोलींत तीन आरशांचें एक ड्रेसिंग टेबल होतें, त्यासमोर निरनिराळ्या तऱ्हेनें उभें राहून ती पहात होती. तिच्या गळ्यांत मोत्यांच्या दोनपदरी सरांचा कोणतासा दागिना होता. वडिलांचा धान्याचा व्यापार या दिवसांत फारच भरभराटीला आलेला आहे हेंच त्यांतलं प्रत्येक मोतीं जणूं बोलून दाखवीत होतं. ती सिनेमाला जाणार होती अन् बरोबर नयना साठे येणार होती, तिची ती वाट पहात होती...

टक् टक्—दारावर आवाज आला.

" येस्, कम् इन् ! " मागें न पहातांच ती म्हणाली व आरशांत पहात तिनें सेंट चोपडीत म्हटलें,

" नयना, कित्ती उशीर करायचा ? किती वेळ वाट पाहून मी दमलें बाई—"

पाठीमागून जरा राकट आवाजांत शब्द आले— " माफ करा. मी दिलीप दिवेकर आहें. आपणाकडे एक जरूरीचं काम होतं, म्हणून आलों होतों—"

" माझ्याशीं ? अन् तुमचं काम ? नाटकाचा प्रोग्रॅम आहे वाटतं आर्ट सर्कलचा ? "

" नाहीं, काम दुसरंच आहे. पंजाबांतून आपले हिंदु लोक निराश्रित होऊन रोज इकडे येत आहेत, ऐकलंच असेल तुम्हीं. आम्हीं एक

सहाय्य समिती काढली आहे. कपडे, औषधं छावणींत पोंचवायचीं आहेत. आणखी त्यांतच स्त्रियांसाठीं राहण्याची वेगळी सोय करायची आहे..."

" बरं मग ? माझा काय यांत संबंध ? "

" पुष्कळच आहे. या सहाय्य समितीला कॉलेजच्या विद्यार्थी–वर्गा-तर्फें एक भरीव रक्कम पोंचवायची आहे. आपण निदान शंभर दीडशें रुपये तरी द्यावे अशी मागणी आहे. "

" काय ? शंभर दीडशें ? मिस्टर दिवेकर, पैसे आमच्या घरीं झाडाला लागतात असं तर नाहीं ना आपण मानीत ? "

" झाडाला नसले, तरी आपल्या या सजावटीला खूप पैसे लागतात असं दिसतं. एकादं जॉर्जेट कमी घेतलं, एकादा दागिना कमी घालायचं ठरवलं, तरी कितीक उघड्या भगिनींना कपडा होईल—"

" सरकारनं ' निर्वासित–पुरवठा ' खात्यावर आपली नेमणूक कधीं केली ? अन् मिस्टर दिलीप, मी कपडे काय वापरावे हा माझा वैयक्तिक प्रश्न आहे. आपण त्यांत पडूं नये. बराय्... ' शो ' ची वेळ झाली. आपण जाऊं शकतां—"

" पण मी रिक्त हस्तें या तुमच्या कुबेरासारख्या हवेलींतून जावं हें बरं नाहीं. देवानं तुम्हांला ऐश्वर्य दिलं आहे. त्यांतूनच त्या उघड्या बंधूंना कांहीं दिलं पाहिजे तुम्हीं. निदान थंडीचे जुने कपडे तरी जमवून विद्या-बाईकडे द्या ! अन् आमच्या समितीला थोडं तरी सहाय्य..."

" पण सरकार भक्कम आहे निर्वासितांची काळजी घ्यायला ! तुम्ही कां उगीच वेळ घालवून हे उद्योग करतां ? "

" कां ?—नाहीं तुम्हांला कळायचं ! सरकार तरी कुणाकुणाची अन् काय काय व्यवस्था पहाणार ? नौखालींतून निराश्रित आले, बर्मातून आले, पंजाबांतून आले, हैद्राबादेहून येऊं लागले आहेत. सर्वांची सरकार एक-दम व्यवस्था कशी करील ? सरकार आपलं आहे अन् ते लोकही आपलेच भाईबंद. आपण सारे एकाच बोटींत आहोंत. आपल्याजवळच

हीं संकटं येऊन ठेपलीं आहेत. कदाचित् उद्यां आपणावरही कांहीं आपत्ति ओढवतील, कुणीं सांगावं ? तेव्हां या बिकट वेळीं बंधुत्वाची भावना..."

"आपण थोडक्यांत सांगूं शकाल तर बरं—"

दिलीप अत्यंत चिडला. तेवढ्यांत नयना आली न् म्हणाली,

"कांचन, अग परवां तुला हवा होता तसला बनारसी शालू आतांच मी मुंदडाच्या दुकानांत पाहिला अन् किंमतही विचारली. फार नाहीं ग, दोनशें सव्वीस रुपये ! मुंदडा तर म्हणाला कीं इनामदारीणबाई तो मागत होत्या, अन् तसला हा एकच नग आहे म्हणून—!" तिचें दिलीपच्या चर्येकडे लक्ष गेलेंच नाहीं.

उत्सुकतेनं कांचन म्हणाली,

"होय ? चल तर मग, मला आतांच तो खरेदी केला पाहिजे. दिलीप दिवेकर, एक्स्क्यूज् अस्, वी मस्ट गो. सो..."

"अच्छा, पन्नास रुपयेही आमच्या सहाय्य समितीला..." धग बाहेर पडूं लागली. कडवट स्वरांत तो म्हणाला.

कुचेष्टेनें ती म्हणाली, "वा ! तुमच्या चिकाटीबद्दल मोठं कौतुक वाटतं. पण पहातां ना आमचे खर्च कसे अफाट आहेत ते ? परवांच बाबांचा वाढदिवस झाला तर झाले पांचशें खर्च एकदम ! तेव्हां मला कांहीं देतां येत नाहीं. जुने कपडे माझ्याजवळ शिल्लक असतात असं आपण समजतां ? मोलकरणीला जातात ते."

दिलीपचे डोळे लालभडक झाले; त्यांतून जणुं पेटलेल्या निखाऱ्यांची आग बाहेर पडत होती. "आधीं असल्या या सगळ्या शालूंची आगहोळी पेटली पाहिजे; त्यावांचून गरिबांना लाजेपुरतं हातभर कापड मिळणार नाहीं ! अन् असल्या वस्तु चौपट महागाईनं विकणारे मुंदडासारखे दुकानदार अन्नाला महाग झाले पाहिजेत–त्यावांचून या मधल्या भिंती नाहींशा व्हायच्या नाहींत...ध्यानांत घ्या, या वर्तनाचा पश्चात्ताप होईल तुम्हाला कधीं तरी. माइंड वेल्—"

तो फाड्फाड् आवाज करीत जिना उतरूं लागला, तोंच कांचनचे टवाळीचे शब्द त्याच्या कानांवर पडले,

"ओहो! दुर्वासमुनी! हा शाप देऊन नका हो जाऊं आम्हां पामरांना—" अन् मग दहापांच रुपये खुळखुळावे तसा हास्यध्वनि—

रक्त येईपर्यंत त्यानं ओठ दांतांखालीं आवळले व तो रस्त्यावर आला. सुंदर दिसणाऱ्या युवतीचं हृदयही कोमल असतं; आपण समजावून सांगितलं तर खात्रीनं तिला दया येऊन सहाय्य समितीला मदत मिळेल, या त्याच्या साऱ्या अपेक्षा एखादं काचेचं भांड पडून त्याचे तुकडेतुकडे व्हावेत तशा छिन्नभिन्न झाल्या होत्या!

यानंतर कॉलेजांत त्यांची जी नजरानजर होई, त्यावेळीं तिरस्कार त्याच्या दृष्टींत मावेनासा होई. प्रथम तिला वाटलं होतं कीं तो एक अगदीं गरीब विद्यार्थी आहे. पण हळुहळू तिला कळलं कीं वऱ्हाडांत त्याचं घरदार आहे, अन् खाऊन पिऊन तें घराणं सुखवस्तु आहे. तरी पण त्याचे कपडे अत्यत साधे असत. मुद्रा करारी, बाणेदार, डोळे प्रभावी अन् वृत्ति अभ्यासू! त्याकडे जवळ जवळ रोज कितीकदां तिची दृष्टि वळे. पण त्याचे डोळे एखाद्या घाणेरड्या झुरळाकडे किंवा पालीकडे पाहिल्यासारखे तिरस्कार ओतूं लागत तेव्हां ती मनांत म्हणे, 'बराच आहे कीं हा! एवढा राग करायला मी कोण याची? इथला प्रत्येक विद्यार्थी माझ्याशीं बोलायची संधि मिळाली कीं खूष होतो. कित्येक मला म्हणतात, 'कांचन, किती गोड दिसतां तुम्ही!' अन् हे राजेश्री बघा एकदां! क्षुल्लक कारणावरून कसे गरमागरम असतात ते. अन् म्हणे 'मधल्या भिंती नष्ट करायला हव्या!' कसल्या भिंती म्हणतो आहे, कुणाला ठाऊक!'

त्या दिवशीं तर तिला त्याचा बराच राग आला. ती मुंदडाच्या दुकानाच्या पायऱ्या चढत होती, तोंच मागून शब्द आले—

"ही पहा शोभेची कापडी बाहुली! हा शालू बहुतेक दोनशेंसव्वीसचा असेल बरं का माधव! अरे, दुकानांत—"

तिनं झटकन् मागें वळून तीव्रपणें पाहिलं, तेव्हां दिलीप थंडपणें मित्राला म्हणत होता—

" अरे, दुकानांत नव्हे—या कांचेच्या कपाटांत ठेवलेली बाहुली म्हणतोंय् मी. बाकी ही सुंदर बाहुली हृदयशून्य आहे हें आपण जाणतों. तसंच सुंदर पोषाक केलेलीं माणसंही पुष्कळदां पाषाणहृदयी असतात, हें आहे का तुला माहीत, माधव ? "

काय बोलणार यावर ? तिला उद्देशून तें भाषण आहे असं शाबीत होण्याजोगं नव्हतं, अन् तरीही त्याच्या प्रत्येक शब्दाचे बाण तिलाच लागत होते. जळफळत ती मोटारींत चढली. तोंवर ते दिसेनासेहि झाले होते. पण त्यांचे ते निर्दय शब्द तिच्या कानांत डांसांच्या त्रासदायक गुणगुणण्या-प्रमाणें ऐकूं येत होतेच... " ही सुंदर बाहुली हृदयशून्य आहे... "

घरीं गेल्यावर उद्वेगानं तिनं कपड्यांचं कपाट उघडलं—नऊ दहा बुट्टीदार उंची सिल्कचीं पातळें दिमाखानें वरच्या खणांत झळझळत होतीं. मधल्या खणांत पन्नास ब्लाऊज न् कितीक तऱ्हेवाईक साड्या ऐटीनं—मुंदडाच्या दुकानांतल्यासारख्या ऐटीनं—बसल्या होत्या. खालच्या खणांत तऱ्हेतऱ्हेचे सेंट्स्, अत्तरं, आरसे, फण्या, कंगवे, असला मीना बझार भरला होता, अन् त्याखालीं कांचनचे सोन्यामोत्यांचे उंची अलंकार होते...केवळ या युद्धकालांत हें वैभव चार वर्षांत कांचनच्या पित्यानं कमावलं होतं.

एकदम तिला ते कठोर शब्द ऐकूं आले— ' या असल्या शालूंची आगहोळी पेटवली पाहिजे— '

चार वर्षांत एवढी भरभराट कां अन् कशामुळें झाली हें सांगायला अर्थमंत्र्यांची परिषद् थोडीच बोलवायला हवी ? चार वर्षांपूर्वी–चाळींत एक लहानसं दुमजली घर होतं त्यांचं, आणि कांचन पायीं, साधींच पांचसात रुपयेवालीं पातळं नेसून हायस्कुलांत जात होती ! या लढाईनं कुणाला हात दिला, कुणाचीं घरं साफ बसवलीं. व्यापारी, जे काळ्याबाजाराचं शास्त्र जाणूं शकत, त्यांची या ४–५ वर्षांत भलतीच भरभराट झाली.

साधं जिरेंमिरें विकणाऱ्यांनींदेखील हवेल्या उठवल्या, मग कांचनचे वडील तर धान्याचे व्यापारी होते. त्यांनीं सोन्यारुप्याचीं कौलं घराला घालावींत यांत काय नवल? कांचनच्या स्वभावांतही लक्ष्मीच्या कृपाप्रसादानं विलक्षण फरक पडला एकदम! उंची वस्त्रें खरेदी करून सारखं नटणंमुरडणं यांतच साफल्य आहे असं ही पोर मानूं लागली. स्वतःपलीकडे जग दिसेनासं झालं होतं तिला. तऱ्हेतऱ्हेचे दागिने घेणं हा एक करमणुकीचा खेळच झाला होता जसा! कांचनच्या वडिलांच्या तिजोरींत आतां पैसे मावेनासे झालेच होते... त्यांची ही एक मुलगी. तिची हौसमौज पुरवायला 'श्रीकृपेनें' त्यांना हजार हत्तींचं बळ आलं होतं जसं कांहीं! पूर्वी कांचन साऱ्यांशीं मिळूनमिसळून असे. पण आतां फक्त श्रीमंतांच्याच मुलींशीं तिची गट्टी जमे.

अशा कांचननं, खरं म्हटलं तर, दिलीप दिवेकरसारख्या वर्गांतल्या एका मुलाचा उपहास मनावर घेण्याचं कांहीं कारण नव्हतं. पण पुष्कळदां विरोध करणारीं माणसंच जास्त लक्षांत राहतात. इतर कित्येक विद्यार्थी कांचनच्या कृपाकटाक्षासाठीं तिष्ठत राह्यचे, ती एखादा शब्द बोलली तर धन्यता मानायचे. त्यांच्याहून दिलीप निराळा. ती दिसतांच तो तुच्छतेनें नाक उडवून जाऊं लागला, तिचे दुर्गुण उघड करूं लागला, अन् म्हणूनच तो तिच्या लक्षांत ठसून राहूं लागला. 'हाच तो उर्मट मुलगा!' ती मनांत म्हणे न् रागानं पाही.

कॉलेजतर्फे 'बंधुभाव' या विषयावर व्याख्यानं व्हायचीं होतीं. सत्रा ठिकाणीं लचकत मुरडत कांचन व्यासपीठावर चढली व तिनं छोटंसं भाषण केलं. कॉलेजमध्यें येणारे विद्यार्थी आपल्या वर्गभगिनींशीं बंधुभावानं वागत नाहींत, चेष्टाकुचेष्टा करतात, वाईट दृष्टीनं पाहातात; तरी वर्गबंधूंनीं 'बंधुत्व' दाखवावं हा तिच्या भाषणाचा आशय होता. 'कुचेष्टा करतात' असं म्हणतांना ती दिलीपकडे अगदीं तीक्ष्णपणें पहात होती. मुलांना हें स्पष्ट विधान रुचलं नसावंसं दिसलं. पण सर्वांत सुंदर व्याख्यान दिलीपचंच झालं. त्यानं स्पष्ट सांगितलं कीं "आमच्या बंधुत्वाची व्याख्या कॉलेजच्या-पुरती नाहींच मुळीं! याहून आपला दृष्टिकोन तरुण पिढीनं विशाल करायला

हवा आतां! चहूं बाजूंनीं आपले लोक संकटाच्या खाईत मरत आहेत, युद्धकाल समीप आहे. आतां, मी श्रीमंत, हा गरीब; मी ब्राह्मण, तो शूद्र; मी कन्नड, हा महाराष्ट्रीय; मी दख्खनचा, हा उत्तरेचा; ह्या परकेपणाच्या मधल्या भिंती आपण काढून टाकण्याची वेळ आली आहे. तोंडचा अर्धा घास देऊन, मरणारे बांधव वांचवून राष्ट्रबल टिकवायला हवं आहे. तसं केलं तर तो आमचा बंधुभाव! पण आम्ही आमच्या शालूंत गुरफटलों आहों! आमच्या बुलन सूटमध्यें मशगुल आहों. 'इश्श, अय्या' करण्यांत वेळ घालवीत आहों; नाहीं तर भांग पाडून दर्यागीतं गुणगुणत आहों. एका निशाणाखालीं राष्ट्रीय बंधुत्वानं स्त्रीपुरुष साऱ्यांनीं आजच्या कठीण परिस्थितीला तोंड द्यायचं आहे. आकुंचित कल्पना सोडून, श्रीमंतीच्या खोट्या वैभवाच्या कल्पना टाकून आमच्या कॉलेजीय भगिनी जगाकडे उघड्या डोळ्यांनीं पाहतील तो आम्ही सुदिन मानूं! आम्हांलाही बाणेदार, तेजस्वी वहिणी हव्या आहेत. पण कोठें मिळतील त्या ?"

टाळ्यांच्या कडकडाटांत तो खालीं बसला. अध्यक्षांनीं त्याला शाबासकी दिली, पण कांचनची नजर मात्र पायतळाची जमीन धुंडत होती. त्याच्यापुढें आपण अगदीं क्षुद्र आहोंत, आपले विचार कोते आहेत याची तिला चमत्कारिक जाणीव होत होती. 'मधल्या भिंती दूर करायच्या! प्रतिष्ठेची भिंत, पैशांची भिंत, कोतेपणाची, जातीयतेची, अज्ञानाची. कसल्या बरें भिंती दूर करायच्या ? छे! परकेपणाच्या! आपले देशबंधु—तेथें प्रांताच्या अभिमानाची भिंत नको, असंच तो म्हणाला, नाहीं का ? उद्यांची वेळ सांगून येत नाहीं असंही तो म्हणाला. मी त्या सहाय्य समितीला थोडं साह्य केलं असतं तर बरं झालं असतं. तो असा कठोरपणानं जेव्हां तेव्हां पहातो बोलतो, ती त्याची नजर सौम्य झाली असती...अन् खरंच, त्याच्या दृष्टिकोनापुढें माझे विचार किती कोते दिसले,...छे! चुकलं का माझं कांहीं !

शरमिंधे विचार आज तिच्या मनांत ये जा करूं लागले होते. कुणाशीं—नयनेशींदेखील चकार शब्दही न बोलतां ती तेथून उठून चालूं लागली.

खरोखरच वेळ सांगून येत नसते! गांधीजींचा अघोर वध झाल्याचं कळलं अन् जणुं सबंध सातारा जिल्हा पेटल्यासारखा झाला. ब्रह्मसत्र

सुरू झालं. अनेक ब्राह्मणांचीं घरं पेटवून देण्यांत आलीं. जे संघाचे लोक होते त्यांचीं व हिंदुमहासभेचे सभासद असणाऱ्यांचीं घरं तर पेटून धडाधड ज्वाला उठूं लागल्या होत्याच. त्यांतच निरपराध ब्राह्मण कुटुंबांच्याही आहुति पडूं लागल्या. खेड्यापाड्यांतून जातीयतेचं विष कॉलऱ्याच्या दूषित पाण्याप्रमाणं झपाट्यानं पसरून वर्णद्वेषाची लागण होऊं लागली. कांचन बापडी ! ती अन् तिचे वडील निष्कांचन होऊन एकेका वस्त्रानिशीं असेच घराबाहेर पडले होते ! कारण काळा बाजार करून श्रीमंत झालेले लोक म्हणजे आयत्या बिळावरचे नाग, असें म्हणून सांपडतील तिथें त्यांचा नायनाट करायला जनतेनं किती उत्सुकता यावेळीं दाखविली ! त्या जाळपोळींत ज्यांनीं गरीबगुरीबांचं अन्न व धान्य, साखर, रॉकेल, दसपट भावांनीं विकून आपलीं घरं उभारलीं त्यांनाहि शासन मिळालं होतं. असले लोक इतके दिवस दिमाखानं वावरत असले तरी त्यांच्याकडे पाहून जनता तिरस्कारानं मान फिरवायची. आतां तर काय ? कितीक दिवसांचे सूड, द्वेष, राग उगवायला महापर्वणीच मिळाली होती ! गुंडांचं पुढारीपण पत्करून त्या गांवांतलीं दोन उंच उंच घरं सामानसुमानासकट, दागदागिन्यांसह, नोटांच्या भेंडोळ्यांसह आणखी धान्याच्या साठ्यांसह पेटवून देऊन जनतेनं आपल्या क्षोभाचं उग्र रूप दर्शवलं होतं......

नयनाहि कुटुंबांतल्या लहान पोरांसह, अन् आईवडिलांसह रस्त्याच्या कडेला "निर्वासित" होऊन रडत बसली होती. कांचनच्या वडिलांना वेड लागल्यासारखं झालं होतं. सातआठ लाखांची मालमत्ता, अवघ्या चार तासांत होळी पेटली होती त्याची. उद्यां काय खायचं ? रात्रीं कुठं झोपायचं ? त्या थंडींत पांघरूण तरी काय ? कसं जगायचं ? सगळेच कठोर प्रश्न होते...गुंडांनीं गांवांतल्या लोकांना धमकी दिली होती कीं "जर कुणी या दुष्ट निर्वासितांना अन्नपाणी देईल तर त्याचंहि घर पेटेल ! याद राखा !" अन् सुरे पाजळीत ते निघून गेले होते.

अशा स्थितींत खरोखरच गांवाबाहेर एका मारुतीच्या देवळांत कांचन हतबुद्ध होऊन बसली होती. आपण आजवर कोणाही गरीबांना साह्य केलं

नाहीं, आतां आपण रस्त्यावरचे भिकारी झालों, आपणाला कोण साह्य करणार आहे ? हे विचार तिच्या मनांत आले. भुकेनं जीव तर व्याकुळ झाला होता. थंडीनं हुडहुडी भरत होती. रस्त्यावर दूरवर तिनं पाहिलं. स्मशानशांतता होती, आणि कर्फ्यूचा अम्मल सुरू झाला होता, म्हणून चिटूपाखरूं फिरकत नव्हतं कुणी. फक्त गुरखे उभे असलेल्या मोटारी सायंकाळपासून हिंडूं लागल्या होत्या.

सात वाजले. दिवेलागणीला थोडा वेळ कर्फ्यू बंद करण्यांत आली होती. लोकांना अत्यावश्यक व्यवहार करायला तरी बाहेर थोडंफार पडणं जरूर होतं. दूधवाले तेवढे बाहेर पडूं लागले होते...त्याच अंधुक प्रकाशांत तिनं कोणीतरी देवळाकडे येतांना पाहिलं. तो तरुण जवळ आला. पाठोपाठ दुसराही एक आला. कांचनच्या हृदयांत वेदना उठली. आजवर हजारदां धिक्कार करणारा तो दिलीप होता अन् त्याचा मित्र माधव होता दुसरा ! कांचनच्या कंठांतून एक हुंदका बाहेर पडला व डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. तो फक्त म्हणाला,

" कांचनबाई, संकटकालांत रडायचं नाहीं. लढायचं. आमच्या कॉलेजच्या दिशेनही लोकांचा मोर्चा आला होता, त्यामुळें वेळेवर आम्ही येऊं शकलों नाहीं. वाटदेखील नव्हती गुंडांनीं मोकळी ठेवली—आडवाटेनं आलों आहों. चला, पलीकडच्या मोठ्या धर्मशाळेंत जाऊं. तिथं आमच्या-सारख्या आठदहा जणांनीं निराश्रित कुटुंबांची सोय जमेल ती केली आहे. साहेबांनीं स्वतःचा पोलीस पहारा दिला आहे, अन्नसामुग्री पण थोडीबहुत आहे...चला. वेळ थोडा आहे..."

डोळे पुसून कांचन उठली व अडखळत म्हणाली—

" नयना तर रस्त्यावरच..."

" तिकडे नेलं असेल त्यांना आमच्या दुसऱ्या मित्रांनीं—"

पुन्हां एक हुंदका अन् अश्रूंचे ओघळ...ते आवरण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली,

" दिलीप...मी तुमच्याशीं वाईट वागलें अन् तुम्ही या संकटांत..."

गंभीर होऊन तो म्हणाला, “ तें सुद्धां सवडीनं बोलूं आपण ! चला बघूं, आधीं या भयाण जागेंतून बाहेर पडा...”

धर्मशाळेंत ती पोहोंचली, तों तिथें नयना अन् तिच्या घरचीं मुलं-माणसं व आजूबाजूचीं ओळखीचीं चारपांच कुटुंबं निर्वासित स्थितींत होतीं. मागें चुलाण्यावर कांहीं तरी कढत असावें. जमिनीवर फाटकीं बसकुरें होतीं. भराभर कपाटांतून दिलीपनं बऱ्याच जुन्यापान्या साड्या, कपडे काढले व त्या कुटुंबांना म्हटलं, “ तूर्त हे पांघरायला आंथरायला घ्या. उद्यां आणखी सोय करतां येईल. भातपिठलं शिजवताहेत आमचे गांवांतले स्नेही. पत्रावळी आहेत. थोडंफार खाऊन घ्या. आजचा दिवस वाईट आहे, पण तोही जाईल. आली वेळ धीरानं पार पाडूं आपण. उद्यां येतोंच मी. ”

कांचनला समजेना, इतकीं पातळं इथं कशीं आलीं दिलीपजवळ ! जुनीं असलीं तरी आज उघड्यांना तींच किती मोलाची ऊब देत होतीं, त्यांची अब्रू संभाळीत होतीं.

दिलीप जायला निघाला तेव्हां तिनं कातर प्रश्न केला,

“ दिलीप, हीं पातळं, लुगडीं, धोतरं, शर्ट सारं कसं आजच्या आज मिळवलंत ? या जाळपोळीचा सुगावा आधीं लागला होता का तुम्हांला ? ”

“ सुगावा कुठला ? राष्ट्रपित्याच्या अमानुष वधानं आम्ही मनच्या मनांत दुःखानं चूर होऊन, कष्टी होऊन राहिलों होतों. पण त्या त्याग-मूर्तीच्या निधनांतून ही विलक्षण जाळपोळ सुरूं होईल ही कोणालाच कल्पना नव्हती ! अन् कांचन, ध्यानांत घ्या, समंजस माणसांचीं हीं कामं नाहींत. गुंड, माथेफिरू, जातिद्वेषाचं विष पसरविणारे समाजकंटक, अत्याचारी यांनींच या आगी लावल्या आहेत...पण तें बोलायची ही वेळ नाहीं. हे कपडे आम्ही पंजाबी हिंदु निर्वासितांना पाठवण्यासाठीं सहाय्य समितीतर्फे गोळा केलेले आहेत. गांवोगांव हिंडून, भीक मागून हे कपडे इथं ठेवले होते. ते लवकरच रवाना करणार, तोंवर इथेंच त्यांची गरज लागली... ”

पश्चात्तापानं कांचन म्हणाली—

" अन् त्या दिवशीं मीं किती उद्धटपणानं तुम्हांला विन्मुख पाठवलं... एक दमडी दिली नाहीं—एक जुना कपडा दिला नाहीं...आपल्या असहाय्य देशबंधुभगिनींची मनांतही आठवण ठेवली नाहीं...छान मला शिक्षा दिली देवानं—सारं सारं गेलं...त्या निर्वासितांना मदत केली नाहीं म्हणून देवानं मला रस्त्यावरची भिकारीण केलं,...निर्वासित केलं—तुमचा शाप खरा झाला...आगहोळी पेटली शालूशेल्यांची— "

तो मृदुपणे म्हणाला, " शाप कसला ? एकादे वेळीं बोलाफुलाला गांठ पडते ! आणि सारं सारं गेलं नाहीं—कांचन ! स्वाभिमान, उमेद, शील, आयुष्याशीं झुंजण्याची ताकद, सद्गुणी आयुष्य...या गोष्टी कुणीही हिरावूं शकत नाहीं तुमच्यापासून...मन मात्र खंबीर राहूं द्या... चिमणीचं घरट मोडलं तर ती नव्या काड्या जमवूं लागते, मुंग्यादेखील वारुळं पुन्हां पुन्हां बांधतात. आपण तर माणसं आहोंत. वडिलांना धीर द्या—आत्तां कर्फ्यू सुरू होईल. आय् मस्ट गो !—उद्यां येईन. "

तो झपाट्यानं बाहेर पडला. किती धीर आला होता तिला त्याच्या शब्दांनीं ! अन् दुसरं, नेहमींचा उपहास, तिरस्कार आज त्याच्या दृष्टींत, शब्दांत नव्हता; तर दृष्टि सहानुभूतीची होती, आपुलकीची भावना होती तिथें !

नव्या शक्तीचा संचार झाल्याप्रमाणं कांचन एकदम वळली व साऱ्यांच्या अंथरुणापांघरुणांची व्यवस्था करूं लागली, जेवणाच्या पंक्ती वाढूं लागली, सांत्वन करूं लागली. जणुं मधल्या परकेपणाच्या भिंती नष्ट होऊन तें निर्वासित मंडळीचं पन्नाससाठ जीवांचं एकच कुटुंब होतं; अशा भावनेनं ती साऱ्यांची विचारपूस करूं लागली...मग नयनाही तिच्या जोडीला आली...मग दुसऱ्याही तरुण पोरी साह्याला आल्या, व त्या बापड्यांना तें कष्टाचं जिणं कांहींसं सुसह्य वाटूं लागलं.

काळ तर कुणासाठींच थांबत नाहीं. तेही कठोर दिवस पचवून तो पुढें चालला. दीपावलीच्या दिवसांचा उत्सव हातावर येऊं लागला होता.

कांचनच्या वडिलांनीं कर्ज व नुकसानीबद्दल थोडी मदत मिळवून पुन्हां एका छोट्या खोपटांत धान्यदुकान उभारलं होतं. पूर्वींच्या त्यांच्या हवेलीच्या मागें गॅरेज होतं, तेवढंसुद्धां हें घरटं मोठं नव्हतं. पण पूर्वीं लांचलुचपत, काळा बाजार, खोटेपणा यांचीही व्यापारांत समृद्धि होती, मोठीच होती. तीही या घरट्यांत नव्हती हें चांगलं होतं. कांचनचं कॉलेज अर्थातच पैशाच्या अभावीं बंद झालं होतं. ती पूर्वीप्रमाणेंच साधं पातळ नेसून सर्व काम करीत होती. जणूं चार वर्षं श्रीमंतीचं एक मोठं स्वप्नच पडलं होतं, तें भंगलं एवढंच ! वरचेवर जणूं तिला ते शब्द ऐकूं येत अन् धीर देत—

‘ कांचनबाई, संकटकालांत रडायचं नाहीं—लढायचं !...’

‘...सारं गेलं नाहीं—सद्गुण, शील, स्वाभिमान कुणी हिरावूं शकत नाहीं...’

अन् या नव्या स्थित्यंतरानं श्रीमंतीबरोबर आलेल्या उर्मटपणा, बेपर्वाई, पोषाखीपणा या साऱ्या उपाधीही नष्ट होऊन ती एक प्रेमळ, कामसू मुलगी झाली होती. दिलीपच्या त्या शब्दांनीं तिला आयुष्याकडे पाहाण्याची नवी दिव्य दृष्टि मिळाली होती. तिच्यांतला हा सुंदर बदल दिलीपच्या दृष्टींतून सुटला नव्हता.

दिवाळीच्या मंगल दिवशीं दिलीपचा हात धरून तिचे वडील आपल्या चंद्रमौळी घरांत आले व त्याला पाटावर बसवीत म्हणाले,

“ दिलीप, तुम्हीं मला त्या संकटांत हात दिला. मला अगदीं या आघातानं खचल्यासारखं झालंय्, तेव्हां कुणाला ठाऊक, पोरीवर नजर ठेवायला मी राहतों कीं नाहीं ! मी गरीब आहे आता, पण माझी कांचन तुम्ही पदरांत घ्याल तर मी—निश्चिंत होईन. पहा, एवढी कृपा कराल ?”

दिलीपनं कांचनकडे पाहिलं. ती पुऱ्या तळीत असल्यानं तिचं तोंड लाल झालं होतंच, पण तिचे गाल फार लाल कां व्हावे हे त्याला समजलं नाहीं. तो खोडकरपणें म्हणाला,

“ मीं कबुली दिली असती; पण कॉलेजमधलीं मुलं वर्गभगिनींच्याकडे वाईट दृष्टीनं पहातात हें होतं यांचं मत ! माझ्या कबुलीनं त्याला पुरावाच मिळतो आहे, म्हणून मी—”

ती चटकन् म्हणाली, "पण मीच मुळीं वर्गबंधूच्या नात्यानं कधीं तुमच्याकडे पहात नव्हतें; तेव्हां तुम्हांला त्या मताची धास्ती नकोय् इतकी !" अन् ती गालांतल्या गालांत हंसली.

चतुर वडील हळूंच उठून गेले !

ती दिलीपला म्हणाली, "एकंदरींत आपल्या दोघांमधल्या परकेपणाच्या, रागाच्या, श्रीमंतीगरीबीच्या भिंती नाहींशा झाल्या आहेतसं दिसतं. पण मी 'हृदयशून्य बाहुली' आहें ना एक ? मग तरीसुद्धां–"

दिलीपनं सांगितलं,

—पण त्यानं काय सांगितलं, हें आपण न ऐकणंच बरं, नाहीं का ?

—✱—

# खरें स्वातंत्र्य !

लतिकेनं आपल्या नव्या घरीं पाऊल ठेवलं तें मोठं सुखावूनच ! तिच्या माहेरीं जरा गरिबीच होती. कामाधामाला माणूस नसे, वडिलांना पगारहि उन्हाळ्यांत छोट्या नदीचं पाणी असं कुठं उगीच एवढंतेवढंसं असावं तसा थोडाच.

पण लतिका मात्र भारी चलाख, हुषार, देखणी नि गोड, शिवाय पदवीधर पोरगी होती. अशा मुलींना लग्नाच्या बाजारांत फार मागणी असते व ' वधूपरीक्षा ' होण्याऐवजीं ' वरपरीक्षा ' करून घेण्यासाठीं चढाओढीचीं नाटकेंहि क्वचित् होतात. तेव्हां लतिकेला अशोकसारख्या श्रीमंत, स्वच्छंद, रंगेल माणसानं पटकावलं यांत नवल नाहीं.

लग्नापूर्वीं प्रेमानं अशोकानं विचारलं होतं, " लता ! तुझ्या विशेष आवडीची गोष्ट कोणती ? "

" ती मला देणार असाल तर सांगेन. " ती गंभीरपणें म्हणाली.

" माझ्या हातांत असेल तें मी जरूर देईन. "

" मला खरं स्वातंत्र्य पाहिजे. मिळेल ना तें तुमच्या घरीं ? "

" अवश्य ! तुझ्यासारख्या बुद्धिमान् पत्नीला स्वातंत्र्य द्यायचं नाहीं तर कुणाला ? नि आमच्या घरीं प्रत्येक माणसाला स्वतंत्रता असते, लता ! पाहशीलच तूं. "

प्रसन्न होऊन लतेच्या ओठांवर हास्यकळ्या फुलल्या आणि त्या पाहून त्याचंहि हृदयकमल विकसित झालं होतं.

घर...घर कसलं ? बंगला, बगीचा, नोकरचाकर यांची समृद्धि होती. फर्निचर, गालिचे, रेडिओ, विजेच्या बत्त्या, पडदे यांची तर दाटी होतीच; त्याचप्रमाणं उंची साड्या, सुकुमार ब्लाऊज, भान हिरावून घेणारे अलंकार अन् मन जिंकून घेणारं सौंदर्यसाधनांचं संमेलन तिथं होतं. अशा घराची, स्वतंत्र मनाची मालकीण लतिका तिथं हुकूम सोडण्यांत गर्क झालेली पाहिली कीं अशोकाचं हृदय प्रीतीनं भारून जाई.

लतिकेला पहिल्याच दिवशीं त्यानं सांगितलं, “ ह्या उंची साड्या, हीं कपड्यांचीं कपाटं, हे आरसे, हा महाल...हें सर्व तुझं राज्य. तूं मनाला येईल तो फेरबदल यांत करून घे. तूं स्वतंत्र आहेस. ”

लतिकेच्या थोरल्या जाऊबाई अन् दीर दोन्हीं मोठीं कार्यकर्तीं माणसं होतीं. भाऊसाहेब त्या गांवच्या म्युनिसिपालिटीचे लोकनियुक्त अध्यक्ष होते. सर्वमान्य, लोकप्रिय, सदोदित कांहीं ना कांहीं व्यापांत गढून गेलेले असायचे भाऊसाहेब.

त्यांच्या पत्नीहि त्यांना साजेशा होत्या. शीलवतीबाई ग्रामोद्धारासाठीं नित्य प्रयत्नांत असत. त्यांच्या समाजसेवेबद्दल लोकांत फार आदर होता. मजूर स्त्रियांसाठीं रात्रीची शाळा त्या स्वतः चालवीत होत्या अन् त्यांची मोठी मुलगी इरावती ही कॉलेजमधल्या साऱ्याच हालचाली, संस्था, चळवळी यांत प्रमुख असे.

लतिका घरांत आल्यामुळं या दोघींनाहि केवढा विसांवा वाटला. आतां शाळा चालवायला गेलं तर घरीं एकटे प्रमोद, प्रेमा, प्रभाकर काय करतील ही मनाला रुखरुख, बोचणी नव्हती. मजूर स्त्रियांना आरोग्यपाठ समजावून द्यायला गेलं अन् घरीं एकाएकीं चार पाहुणे आले तरी काळजी नव्हती. कॉलेजमधल्या मित्रमैत्रिणी चहाफराळाला आल्या तरी इरावतीचा जीव अगदीं निश्चिंत होता.

लतिकेसारखी हंसतमुख, चतुर स्त्री या घराची खरंच स्वतंत्र स्वामिनी झाली होती कीं नाहीं ? घराची मांडणी, सामानाची सजावट, आरशांची आकर्षक रचना इत्यादींची ती करील ती व्यवस्था घरांतल्या प्रत्येक

माणसाला मान्य असे. स्वयंपाक्याला हवे ते जिन्नस ती करायला सांगे; कुणी त्यांत कांहीं बोलत नसे ! वाटेल ती सुंदर वेषभूषा ती करी. किती मैत्रिणी येत, त्यांना चहा-फराळ, खणकापडें ती देई; कुणी त्याबद्दल अक्षर बोलत नसे रागावून ! मनाला हवा असलेला जिन्नस आचारी बनवून घाली. हवी तशी फुलांची वेणी ती विकत घेई, स्वच्छंदपणें चाहेल ते अलंकार ती वापरीत असे. पण तिला त्याबद्दल बोलून कुणीं कधींच दुखवलं नाहीं. उलट, ती घरांतल्या प्रत्येकाचें हवं नको, दुखलं-खुपलं किती अगत्यानं काळजी-कांट्यानं पाहते, साऱ्या घराला जाऊबाई आल्यानं किती जिवंतपणा आलाय्, भाऊजी कसे ' सुतापरी सरळ ' वागताहेत, याचंच शीलवतीबाई कौतुक करीत रहात ! खरंच, लतिका आल्यामुळं घराला केवढी शिस्त लागली होती !

आपल्याप्रमाणं स्वतंत्र, सुखी कोण आहे असं लतिकेच्या मनांत वरचेवर येई.

त्या रात्रीं चंद्र आकाशांतून कौमुदीची बरसात करीत होता अन् निशिगंधाच्या ताटव्याचा सुगंध अन् मंद समीरण यांच्या सहवासानं बागेंत कुंजांत बसलेल्या त्या नवपरिणीतांची वृत्ति उल्हसित झाली होती. अशोक तर एका गाण्याची शीळ घालीत होता.

ती हंसून म्हणाली, " एक विनंति आहे गडे. "

" विनंती ? आज्ञा म्हणेनास ! "

" नाहीं, नाहीं. विनंतीच ! किनी, माझ्या वर्गांतली ती सुंदर कोपरकर आली होती. आम्ही अगदीं जिवाच्या मैत्रिणी. मला एकदां टोयिक ताप आला होता एकवीस दिवसाचा, तेव्हां सुदरनं माझी किती सेवाचाकरी केली ! जाग्रणंसुद्धां केलीं. मला तिनं वांचवलं ! "

" असं असं ! बरं, यांत विनंतीचा भाग कोणता ? "

" जा गडे ! पुरतं ऐकूनसुद्धां घेत नाहीं ! " रुसून ती उद्गारली, " ती किनई अगदीं पैशाच्या अडचणींत आहे हो. हातातोंडाला आलेला भाऊ अपेंडिसायटिस्नं आजारी आहे तिचा. "

" मग, मीं यांत काय करावं ? "

" सांगतें ना. ऑपरेशनला पैसे हवे आहेत बापडीला. घर बसणार नाहीं तर त्यांचं. पांचशें रुपये देऊं का ? फार मनांत आहे तसं. "

" पांचशें ? बापरे ! "

" हे काय ? अहो, माझा शालूच मुळीं पांचशांचा नाहीं का ? माझ्या जिवाचं मोल त्याहूनहि का कमी आहे ? तिनं मला जीवदान दिलं. उपकार फेडायची ही नामी संधि नाहीं का ? "

" अग, कपडे–दागिने वापरणं निराळं अन् उचलून पैसे देणं निराळं ! दादांना हें नाहीं खपणार बुवा ! अन् मलाहि पटत नाहीं तें. "

" तर मग देऊं शकत नाहीं तुम्ही ? मला मोठा भरंवसा होता; म्हणून मीं ' देतें ' म्हटलं आहे. माझा शालू कोराच आहे. दुकानांत परत देऊन टाकतें मी. नसला तरी चालेल मला शालू...पण आपला शब्द राखला पाहिजे. "

" शी: ! भलतंच काय बोलतेस ? घरचे कपडे विकणं म्हणजे दादांच्या अन् माझ्या खानदानीपणाला डाग लागेल, लता ! तूं उगीच काय हट्ट करतेस ? चल, एक गाणं म्हण छानसं ! "

" बरं, मग मी उद्यां भाऊजींना, जाऊबाईंना विचारूं का ? "

" छे ! ते मुळींच ' हो ' म्हणणार नाहींत. अन् तूं विचारणं बरं नाहीं. "

" मग देतां नाहींच यायचे ? गरीब बिचारी ! केवढी आशा होती तिला ! "

" पण गरिबांनीं भलत्याच आशा ठेवल्या तर पुऱ्या कशा होणार, लता ? जाऊंदे, जगाची काळजी करायची आहे काय आपल्या दोघांच्यांत ? नि तीसुद्धां या रम्य वेळीं ? वेडी कुठली ! " अशोक रंगांत येऊन म्हणाला.

ती कांहीं बोलली नाहीं; पण फिकट, उदास असा चंद्रसुद्धां आपल्याला हंसला असं वाटून तिनं रागानं डोळे मिटून घेतले एवढं खरं.

दुसरे दिवशीं इरावती काकूच्या धांदलीकडे पाहात नवलानें उद्गारली, " हें काय ? तूं कुठं निघालीस काकू ? बॅग भरते आहेस अगदीं ? "

इरावतीच्या या प्रश्नावर गंभीरपणें ती म्हणाली, " आम्ही कॉलेज-मधल्या वीसजणी आज तीन वर्षांनीं स्नेहसंमेलनासाठीं एका श्रीमंत मैत्रिणीकडे—आमची विमल सरवटे म्हणून एक मैत्रीण जहागिरदारीण झाली आहे तिच्याकडे—जमणार आहों. फोटो आहे, खेळ आहेत, शर्यतीसुद्धां आहेत; खेड्यामध्यें अंगतपंगतीचा बेत आहे अन् गायन-वादन असे खूपच कार्यक्रम आहेत तिथं उद्यांपासून दोनचार दिवस ! किती मला आनंद झालाय् त्याचा ! "

" अशोककाका ' जा ' म्हणाले वाटतं ? "

" अजून मीं तसं पक्कं विचारलं नाहीं; पण ' नको ' म्हणण्याजोगं यांत काय आहे ? लग्नानंतर वर्षानं आजच कुठं मी दोन दिवस जातें आहें. तीन वर्षांनीं भेटी होतील. बरं, मूलबील असतं तर निराळं ! सांगेन आल्यावर त्यांना ! "

" काकू, तूं जाऊं नकोस गडे ! माझा वाढदिवस चार दिवसांनीं आहे. "

" मग, मी नसलें तरी तो छान होईलच. काय कमी आहे इथं ? "

" तसं नाहीं गडे. मी तर माझ्या साऱ्या मैत्रिणी, मित्र अन् हो, उमाकांत पराजपे यांना मोठी चहापार्टी देणार आहे. तसं सांगितलंसुद्धां काल मीं सगळ्यांना. सुमारें पन्नास तरी मंडळी आहेत, काकू ! "

" मग आपल्या आचाऱ्याकडून करवून घ्या तुम्ही सारं. बाई अन् तूं पाहुण्यांची व्यवस्था पाहूं शकाल, नाहीं का ? "

" आईला कुठला आलाय् वेळ ? त्यांच्या मजूरशाळेची परीक्षा आहे लवकरच. "

" मी या घरीं येण्यापूर्वी कसं करीत होतां ? तसंच समजा ना एक आठवडाभर ! मी या संमेलनाला जाणारच ! तुमचा वाढदिवस थोडा उशिरां चार दिवसांनीं करूं ! "

" शीः ! वाढदिवस तो ! तो कसा वाटेल तेव्हां करायचा ? "

" तर मग आईला सांग तुझ्या वाढदिवसाची जोखीम घ्यायला ! "

" तूं नाहीं तर ऐकत ? जाणारच ? "

" हं. ह्या वर्षात प्रथमच मी हें म्हणतें, हेंहि मनांत आण इरावती. "

थोडासा खटकाच उडाला एकंदरींत. परंतु तिनं आपला निश्चय बदलला नाहीं. पाहुणेराउणे नित्य होतेच, मुलांचीं दुखणींबाणीं नित्य चालत, त्या वेळीं शीलवतीबाईऐवजीं धाकट्या काकूचेच श्रम चालायचे ! भेटी, प्रतिभेटी, मेजवान्या, चहा, आइस्क्रीमच्या पार्ट्या, सर्व गोष्टी अशा श्रीमंतांच्या घरांत अविश्रांत चालतच असतात. याला टिकाव धरूं शकणारं 'घरचं' असं एक खंबीर बाईमनुष्य कंबर कसून उभंहि असावं लागतं; तरच या खाक्याचा निभाव लागतो, एरवीं नाहीं ! शीलवती-बाईंच्या मागं कितीतरी कामं ! इरावती तर कॉलेजकुमारी. तिला वेळ नाहीं ! मग लतिकेवरच हा घरचा कर्तेपणाचा भार पडे यांत संशय काय ?

दुसरे दिवशीं सकाळीं पुन्हा चहाच्या पेल्यांतलं वादळ झालंच सुरू !

" खरंच का तूं कुठं गांवाला जाणार ? " शीलवतीबाईंनीं प्रश्न केला.

" हो. मी चपानगरला जाऊन येतें चार दिवस. मला विश्रांति हवीय् ! "

" पण ठिकठिकाणीं गडीमाणूस तर आहे. एवढं दमण्याजोगं काम नाहीं. "

" मग असं सोपं काम दोनचार दिवस तर काय आपण अन् इरावती सहज निभावून न्याल ! त्याचं काय एवढं ? "

" तसं नाहीं ग. पण तुला जातां येणार नाहीं. "

" म्हणजे ? "

" या वेळीं कसं पाठवावं तुला ? उद्यां त्या अफझुलपुरकर जहागिर-दारांच्या सुनांना मीं जेवायला बोलावलं आहे. डोहाळजेवण म्हणून करूंया. माझ्या दहापांच मैत्रिणी आहेतच... "

" पण माझी सोय–गैरसोय नकोच का पाहायला? आचारी आहे, करील सारं. मला कंटाळा आलाय् या घरबशेपणाचा ! "

" अग अग, तूं लहान, सासुरवाशीण ! काय बोलतेस ? "

" मी जाणार ! कांहीं होवो ! आमच्या सगळया जिवलग मैत्रिणी जमणार... "

" छे छे. तुला कसं जातां येईल ? मला आतांच सहावीच्या क्लासला जायचं आहे. प्रमोदला ताप भरलेला दिसतो आहे. आणखी..."

" इरावती मोठी बहीण, पाहील चार दिवस भावंडांकडे. ज्यूनिअरचं तर वर्ष. आहे ठाऊक अभ्यास किती करावा लागतो तें मला. मीहि ग्रॅज्युएट झालेलीच आहें कीं ! " रागानं ती म्हणाली.

" छे, छे ! तूं आतांशा फार बोलतेस बरं का. या घरांत स्वतंत्रता मिळते, सवलत आहे, म्हणून तुझ्यासारख्या शहाण्या मुलीनें असा फायदा घेणं बरं नाहीं. तुला या वेळीं जातां येणार नाहीं. स्पष्ट सांगतें मी. माझी अडचण आहे अन् तूं घरची मुलगी कशी जायचं म्हणतेस ? " शीलवतीबाई थंडपणें म्हणाल्या.

समोरच्या खुर्चीवर अशोक सर्व ऐकत होता. तो म्हणाला, " आतां नको जाऊंस तूं. खरंच नको ! "

चिडून ती फणकाऱ्यानं म्हणाली, " हो ! या घरीं प्रत्येकाला स्वतंत्रता आहे; पण मी तेवढी अगदीं परतंत्र आहें ! अन् म्हणे स्वतंत्रता आहे ! कसली कर्माची आहे स्वतंत्रता ? "

इरावती हंसत म्हणाली, " रागावूं नकोस काकू ! अग, खाण्यापिण्याची, कपड्यांची, ऐश्वर्याची स्वतंत्रता नाहीं का ? "

" तर काय ! " अशोक उद्गारला.

तेव्हां लतेनं एकदां त्याच्याकडे जळजळीत नजरेनं पाहिलं व मान फिरवली. मात्र चंपानगरला जाऊन मैत्रिणींची गांठ ती घेऊं शकली नाहीं एवढं खरं !

"आज पुन्हा कसला बेत ?" अशोकनं तिच्याकडे पहात विचारलं. खादीचं शुभ्र पातळ, पाठीवर विसांवलेला कृष्णसर्परूप शेपटा अन् अत्यंत साधासुधा पोलका पाहून त्यानं आश्चर्यानं डोळे विस्फारले. नेहमींची शोकीन लता हीच का ? उलट रंगीबेरंगी फुलांचं पातळ, ऐटबाज उंची सॅटिनचे ब्लाऊज, मनोहर चक्र, त्यावर फुलांचा फुलोरा, पॉवडर, स्नो इत्यादींची खुलावट अन् नाजुक मोत्याची माळ किंवा नेकलेस, जाळीच्या बांगड्या इत्यादि अलंकार...यांचं नित्य दर्शन देणारी रोजची लता हीच ? छे ! हें कांहीं निराळंच प्रकरण दिसतं !

अत्यंत गंभीर होऊन ती म्हणाली, "कशाला तुम्हांला सांगायचं ? वासलात लावून टाकाल तुम्ही त्या बेताची. आमच्या संमेलनाची झाली तीच तऱ्हा होणार. म्हणून सांगतच नाहीं मी !"

"पण कुठं चालली आहेस ?"

"कुठं तरी...!"

"सांग तर खरी ! मी नाहीं कांहीं म्हणत; मग तर झालं ?"

"सांगतें तर मग. मी जाणार आहें दादा चौधरींच्या व्याख्यानाला अन् स्वागतपद मीच म्हणणार आहे आज तिथं !"

"अं हं ! तें नाहीं चालायचं, लता. नको जाऊंस तूं !"

"अय्या ! पुन्हा नकारच आहे म्हणायचा ! कां ? कां नाहीं चालणार ? कुठं व्याख्यानाला जायलासुद्धां मी स्वतंत्र नाहीं का ?"

"त्या माणसाचं भाऊसाहेबांशीं खासगी वैर आहे...होतं. आम्ही ज़मीनदार ! तो एक आमचा क्षुल्लक खंडकरी ! त्यानं साऱ्यांना चिथावून आमचं उत्पन्न वसूल होऊं दिलं नाहीं ! मोठा उलाढाल्या माणूस !"

"छे छे ! भूमिगत, क्रांतिकारक गुप्त वीरांतले दादा चौधरी प्रमुख आहेत. दोन वर्षांनंतर ते प्रकट झाले आहेत. मायदेशासाठीं साऱ्या आयुष्याचं, उत्साहाचं बलिदान करणारे चौधरी वाईट खास नाहींत. गरीब कुळांकडून पैसे वसूल करणारे जमीनदारच त्यापेक्षां..."

" हां हां, कुणाबद्दल बोलते आहेस लता? मी गरीब आहें, वाटेल तें ऐकून घेतों. पण माझ्या थोरल्या बंधूंचा अपमान केलेला मात्र मला नाहीं खपणार!"

तिला मधेच अडवून रागानं तो असं ओरडला, तेव्हां ती म्हणाली, " बरं, राहूंद्या. मी जाऊन येतें. मग बोलूं सावकाशीनं!"

" नको! तूं गेलीस तर लोक आम्हांला हंसतील. म्हणतील, कीं नवरा कुळांकडून पैसे उकळतो म्हणून दादा चौधरी शिव्या देतो त्याला, अन् बायको त्याच चौधरीला पंचारती करते! शेम!" अशोक चिडला होता.

" पण तुमचं प्रत्येक मत मला मान्य असेल असं समंजस लोक तरी मानणार नाहींत!" ती कडवट शब्दांत पुटपुटली.

" तरीपण उगीच चर्चेला जागा द्यायची कशाला? शिवाय, हीं पहा मी 'कोटणीस'चीं तिकिटं आणलीं आहेत काढून. चल, आपण जाऊं तिकडेच."

त्याचा आर्जवी स्वर ऐकूनहि निग्रहानं ती कठोर होऊन म्हणाली, " मी नाहीं येणार. मला त्यांचं व्याख्यान ऐकायचं आहे!"

" लता!" एकदम गंभीर शब्द ऐकून ती मागं वळली. दारांत भाऊसाहेबांची उग्रगंभीर मूर्ति पाहतांच लतेची नजर खालीं वळली.

" कोण लता! तूं त्या दादा चौधऱ्याच्या सत्काराला जाणार? राहूंदे तो वेडेपणा. मोठ्या घरची कुलशीलाची सून तूं. आमचा वैरी आहे तो बरं पोरी! बरं, जाऊंदे. आज आमचे कुंदगोळकर इनामदार, त्यांचा मुलगा, मुली अन् बायको येतील आतां साताच्या एक्सप्रेसनं. पाहुणे बडे आहेत. आपल्या इराला पाह्यला अन् चार दिवस मजेंत राह्यला येताहेत. नीट व्यवस्था ठेवा. आजचा बेत पुरीबासुंदीचा करा. दूध आणून देईल आतां जिवबा. स्वैंपाक तयार राहूंद्या सातला."

तिला बोलायचं साहस झालं नाहीं थोरल्या भाऊजींपुढं! व्याख्यान नाहीं, कोटणीससुद्धां नाहीं! स्वतःचं मत नाहीं, नवऱ्याचंहि नाहीं!

स्वतःला अस्तित्वसुद्धां नाहीं स्वतंत्रपणाचं ! दुसऱ्याच्या मर्जीवर पडणारीं पावलं आपटीतच ती परत वळली !

* * *

पाहुणे गेले. घरांतील शांतता दिमाखानं डामडौल दर्शवूं लागली होती. पण लतिकेच्या मनांत मात्र अशांतीचं साम्राज्य भरून राहिलं होतं. त्या मुलींच्या हंसऱ्या चेहऱ्याकडे पाहात ती म्हणाली, " ठीक आहे. मी वर्षभर तुमच्या समितीची संचालिका होईन. मी रोज समितीवर येईन, खेळांत भाग घेईन अन् पी. टी. चा मीं कोर्स घेतला होता त्याचंहि शिक्षण देईन; गोष्टी सांगेन, बौद्धिक घेईन तुमचं. मग तर झालं ? "

" खरंच ! छान झालं बाई. तुमच्यासारख्या हौशी नेत्या मिळाल्या ! आमच्या प्रगति-समितीचं भाग्यच मोठं म्हणायचं ! " त्या पोरी उद्गारल्या. हास्यविनोदाची किलबिल झाली अन् तो ' चिमुकल्यांचा ताफा ' भुरदिशीं उडून गेला.

कपाळाला आंठी घालूनच अशोक बाहेर आला अन् म्हणाला, " आतां ही कसली आणखी नवीन भानगड काढलीस ? "

" मी एक निर्बुद्ध मुलगी आहें. तुम्हीं आमच्या भानगडींत लक्ष घालूं नये. " रुक्षपणाचं उत्तर आलं.

" तरी मीं ऐकलं. मला हे संघ, समितीचं फॅड आवडत नाहीं, लता. "

" पण मला आवडतं अशोक तें ! समिति पक्षभेदातीत असते बरं का ! "

" असेल. ते लाठीकाठीचे प्रयोग कशाला हवे आपल्याला उगीच ? "

" खरंच, स्वतंत्र लढाऊ वृत्तीला पोषक असतात ते प्रयोग ! त्याऐवजीं आमचीं मनं मारून टाकणारं, मेचटपणाचं, अन्याय सोसण्याचंहि शिक्षण आम्हांला पाहिजे आहे तुमच्या मतानं ! खरं ना ? "

" लता ! लता, फार झालं ! " अशोकानं गंभीर सूचना केली.

" काय, मला 'बोलण्याची'हि चोरी आहे ? ठीक. हें पाहा मीं माझ शब्द परतवले. पण मी रोज समितींत जाणारच. या साऱ्या पर्वतप्राय जबाबदारीचा भार आणि घरांतला तोचतोपणा मला नकोसा झालेला आहे. मला कसलीच स्वतंत्रता नसेल तर मी इथं जिवंत राहणंहि अशक्य होईल !"

" स्वतंत्रता तर कितीतरी आहे ! मी म्हणून देतों तेवढी तरी. आमच्या घरांत वहिनींनासुद्धां किती स्वातंत्र्य आहे ! इरालादेखील आहे ! तुला आहे ! उगीचच कां बंड ? स्त्रीस्वातंत्र्य या घरीं आहेच !"

" उगीच ? ठीक ! उद्यांच बोलेन. आतां समितींत निघालें आहें मी."

" जाणारच ? घरीं कुणी नाहीं ! तो हा येणार आहे चहाला !"

" इरावती येईल आत्तां कॉलेजांतून. तिला सांगा थांबायला अन् देखरेख पाहायला !"

" लता !"

" मी आतां तुमच्या डोळ्यांना भीत नाहीं मुळींच ! काय, हें घर आहे का सोंग आहे ? माझ्याखेरीज प्रत्येक मनुष्य बाराबारा तास बाहेर काढतो आहे अन् मी क्षुद्र कुठं घटकाभर जाईन म्हटलं तर मला या घबडग्यांतून सुटका नाहीं ! प्रपंच, मुलं बाईचीं ! घर भाऊजींचं ! कुळं, खंडकरी, पाहुणे भाऊजींचे ! मित्रमैत्रिणी, कॉलेज, चहाफराळ इरावतीचे ! अन् चैन, ऐषआराम तुमचे ! माझं काय आहे या घरांत ? तरी मी अष्टौप्रहर बुडून राहूं त्यांत ? हीच स्वतंत्रता काय ? मी नाहीं आज ऐकणार !" बेफामपणानं ती आज बोलत होती.

" लता ! समितिबिमिति चालणार नाहीं हं !"

" बरं तर ! मारुतीला नाहींतर सांबाला जाऊन येतें बरं का ! नाहींतर घटकाभर पुराणाला जातें देवळांत ! जुन्या बायकांना तेवढी तरी स्वतंत्रता होती, ती तरी मिळूं द्या मला ! पाय मोकळे करून येणार आतां ! तुम्ही वाटलं तर घालवून द्या मला घरांतून ! पण आज मी चांगली पांच मैल फिरायला जाणार ! कंटाळा आलाय् मला घरांत बसून."

मग तिनं मागंसुद्धां पाहिलं नाहीं. ताड्ताड् जिना उतरून ती दिसेनाशी झाली. तो हतबुद्ध होऊन पहात राहिला.

* * *

रात्रीं कित्येक दिवसांनीं आज चांदण्यांत गप्पागोष्टी चालल्या होत्या सगळ्यांच्या ! अशी वेळ फार क्वचितच येई. कारण कार्यबाहुल्यामुळं शीलवती व भाऊसाहेब यांना वेळ नाहीं, इरावतीचा अभ्यास अन् अशोक टाइम्समधलं कोडं सोडवीत बसे रात्रींचा. तेव्हां आज कर्मधर्मसंयोगानें हा योग जमला होता; तो कपिलाषष्ठीचाच म्हटला पाहिजे.

" धाकटी काकू आतांशा भारी उदास असते. नीट बोलत नाहीं कीं हंसतखेळत नाहीं. " इरानं विषय काढला.

" काय झालंय् तिला अशोक ? पोरीचा स्वभाव तर मिष्ठास आहे एरवीं. " भाऊसाहेब उद्गारले.

" पण, तिला स्वतंत्रता हवी ! ती मिळत नाहीं म्हणे ! " इरानं उत्तर दिलं त्यांत बराच खंवचटपणाचाहि भाग होता.

" वेगळं बिऱ्हाड करायचं म्हणते कीं काय ती ? " भाऊसाहेब म्हणाले.

जाऊबाई कडवट स्वरांत उद्गारल्या, " माणूस मिळत नाहीं, दूध मिळत नाहीं, घरसुद्धां सध्यां कुठं नाहीं मिळत. करून पाहूदे हवा तर स्वतंत्र संसार, म्हणजे कळेल स्वातंत्र्याचं सुख ! खरं पाहिलं तर माझ्या-सारखीच तीहि स्वतंत्र आहे...केवढा बोभाटा चाललाय बापडीचा ! "

ताड्कन आंतून ती गच्चीवर आली. जणूं विद्युतच तळपूं लागली तिथं ! ती एकदम म्हणाली, " भाऊजी, या साऱ्यांना माझाच मूर्खपणा वाटतो; पण तुम्ही विचारशील आहां. तुम्ही तरी न्याय द्या. या घरांत प्रत्येकाला स्वतंत्रता आहे; मला मात्र नाहीं. मला काय वाटतं तें उघड बोलायला मी स्वतंत्र नाहीं ! मला स्वतंत्र मत असणं योग्य नाहीं ! मला स्वतंत्र करमणुकीची जरूर नाहीं ! मला मनासारखं घटकाभर मोकळ्या हवेंत जाण्याचंसुद्धां स्वातंत्र्य उरलेलं नाहीं ! सदोदित पन्नास

पाहुणे अन् घरांतल्यांची व्यवस्था ! यांतून माझ्या आयुष्यांत पांच मिनिटंहि मला उरत नाहींत ! मी एवढी शिकलें, चार बालमनांवर सस्कार करण्याची माझी पात्रता...पण छे ! कुणाला थोडा वेळही ज्ञानदान करण्याचं मला स्वातंत्र्य नाहीं; किंवा एवढ्या या वैभवाच्या राशींतून चिमटीभर धान्य कुणाला द्यायलाहि मला सत्ता नाहीं ! ! मला स्वतंत्र अस्तित्व या घरीं कधींहि मिळणारच नाहीं का ? ”

भाऊसाहेब हतबुद्ध होऊन तिच्याकडे पाहात राहिले. पेटलेल्या चंद्र-ज्योतींतून ताड्ताड् लालबुद अग्निरसाचे टिपके उडावे तसं तें भाषण त्यांना भासलं. ते म्हणाले, “ ते कां ? माझ्या पत्नीला अन् इरावतीला तरी खरं स्वातंत्र्य आहे ? तें तुला मिळालं तर मग तक्रार नाहीं ना ? ”

“ तुम्ही कांहीं म्हणा ! तेंहि खरं स्वातंत्र्य नाहींच ! घरांतल्या इतरांचा कसलाहि विचार न करतां स्वच्छंद वागणं याला कुणी स्वतंत्रता म्हणेल का ? लोकांची गळचेपी करून मिळालेलं स्वातंत्र्य खर स्वातंत्र्यच नव्हे. अन् असं सारखं बाहेरहि मी राहूं इच्छीत नाहीं...पण न्याय योग्य तो मिळावा हीच विनंति ! भाऊजी, मी लहान आहे, तुम्ही सांगाल तसं मी वागेन. पण—”

जरा वेळानं गंभीर मुद्रेनं भाऊसाहेब उद्गारले, “ ठीक. समता हवी आहे तुला. आठवड्यांतले तीन दिवस तूं गृहजीवन पाहावं व तीन दिवस यापुढं शीला पाहात जाईल. सातवा एक दिवस इरानं गृहव्यवस्था ठेवावी. अशानं प्रत्येकीला तीनचार दिवस स्वतत्रता मिळेल. मात्र त्याचा सदुपयोग व्हावा, हीच इच्छा. ”

सारे गंभीर झाले होते. पण लतेच्या चर्येवर समाधानाचा प्रकाश चमकूं लागला होता.

—*—

# तिलोत्तमा !

" बाबूजी ! मै अंदर आउगी ? "

तो प्रश्न ऐकून चमकून सतीशनें वर पाहिलें. तिचा चेहरा त्याला नीटसा दिसला नाहीं, कारण तिची मान खालीं होती; परंतु केसांतून मधोमध जाणारी भांगाची शुभ्र रेषा त्यानं पाहिली. चटकन् पावलांकडे त्याचं लक्ष गेलं...तीं आलत्यानं रंगविलेलीं होतीं......

" हां—जरूर ! " तो उद्गारला व ती आंत आली. आदबीनं एका कोपऱ्यांत उभी राहून ती हिंदींत बोलूं लागली......

" आपल्या या वाड्याच्या तळमजल्यावर एक खोली रिकामी आहे ना ? "

" छेः कोणतीच खोली रिकामी नाहीं ! " सतीशनें उत्तर दिलें. तिची मुद्रा आणखी खिन्न झाली. ती म्हणाली, " जिन्याखालीं एक खोली आहे. तिला कुलुप आहे ती...मीं म्हटलं..."

सतीश म्हणाला, " छे छे ! ती माझ्याकडेच आहे. आमची सरपणाची खोली आहे ती. वर्षाचं सरपण मी तेथें ठेवतों. ती रिकामी नाहीं..."

" मला दाखवतां का उघडून, प्लीज—? बाबूजी, मला माफ करा, पण ती एकदां पाहू द्या ना मला. "

ते खिन्न शब्द असले तरी, त्यांतला सद्भाव आणि माधुर्य सतीशनें चटकन् ओळखलें. किल्ल्यांचा झुपका घेऊन तो झपाझप खालीं आला. ती रिकामी खोली त्यानं उघडली. अर्ध्या भागांत लांकडें वरपर्यंत रचलेलीं होतीं खरींच ! अर्ध्या भागांत कुठें मोडकंतोडकं सामान, अडगळ, रद्दी कागद पडलेले होते...धूळ तर मुलूखभर झाली होती.

किंचित् शरमून तो म्हणाला, "ही अडगळीची खोली आहे...फार केरकचरा आहे...पहाण्याजोगी नव्हती ती...बरें, लावून टाकूं? पाहिली ना ही गलिच्छ जागा? चला तर!"

त्या मुग्ध ओठांवर निराशेचेंच हास्य उमटलें. ती म्हणाली, "अड-गळीची खोली—! आमच्यासारख्या अडगळीला ती कांहीं वाईट नाहीं, बाबूजी...!"

जिना चढणाऱ्या सतीशनं मागें वळून पाहिलं. त्याच्या पावलांवर पाऊल टाकून ती तो सोपान चढत होती परत! तो माडींत आला, तीहि परत आली व हलकेच मंजुळ स्वरांत म्हणाली,

"बाबूजी, मीहि कुलवंताची कन्या आहें...माझ्यावर विश्वास ठेवाल का? मी तुमच्या लांकडांना हातही नाहीं लावणार. पण त्या बाकीच्या अर्ध्या जागेंत मी राहूं का बाबूजी?—" सतीशच्या विचित्र नजरेकडे पहात ती पुढें म्हणाली, "असा राग करू नका......फूटपाथवर रात्र काढण्यापेक्षां अडगळीची खोली निवाऱ्याची नाहीं का? मला चालेल! आज आठ दिवस सारखी हिंडतें आहे, पण कुठं जागा नाहीं. बरं—मग बाबूजी, मी काय समजूं......?"

सतीशला समजेना काय उत्तर द्यावें तें. या असल्या सगळ्या गोष्टी त्याची आई पहात असे. पण ती तर मुलीच्या बाळंतपणाला चार दिवसां-पूर्वीच गेली होती!

तो कांहींसें उत्तर देणार तोंच एक मराठा जातीची, कळकट पण कठोर दिसणारी बाई तेथें येऊन उभी राहिली. सतीश म्हणाला, "रखमा! कालपासून कामावर आली नाहींस? जा, आतां तरी कर झपाझप्—चहाचीं भांडीं कालचीं आजचीं पडलीं आहेत, धुण्याचे कपडे तसेच आहेत..."

ती हंसून म्हणाली, "मी काम सोडनार हाय, सतीशसाब! मला नाइत्रा धा रुपैला यवढं काम कराया हुयाचं! गिरनींत तर रोजचा सवा रुपया हाय न् काय! अन् हतं पघा! अवगं धा टिकल्या दावूनशान

केयेर, धुनं, पानी भरनं, भांडीं घासनं, समदें म्हनं करा ! नाहीं हुनार बा ! च्या पन करून देयाचा आनकी तुमासनी—"

सतीश हतबुद्ध होऊन म्हणाला,

"पण आई येईपर्यंत तरी थांब रखमा—"

"मग तीस रुपै द्याया होवे, तर काम करनार—"

"तीस ? बापरे, रखमा—"

"बरं तर, मग...मी कामाला नाय येत...दुसरं बगा कुनी !"

ती ताड्ताड् पावलं टाकीत निघून गेली...सतीश चहूंकडे पाहूं लागला...अन् त्यानं कंटाळून सिगरेट पेटवली.

उभी राहून राहून शेवटीं ती युवती म्हणाली,

"बाबूजी...त्या खोलीचं भाड मला किती द्यावं लागेल ?"

सतीश त्रासून म्हणाला,

"हें पहा, मी कोण फिकिरींत आहें ! सैपाकी कालच भांडीं चोरून अन् माझे कांहीं कपडे लांबवून निघून गेला आहे ! मोलकरीणही निघून गेली...या गांवांत कामाला माणूस मिळत नाहीं ही तक्रार श्रीमत लोकसुद्धां करताहेत...गांवांत नीटशी खानावळदेखील नाहीं...मी पडलों आहें विचारांत ! यावेळीं तुम्ही तरी सतावूं नका मला..."

"यांत कसली फिकीर बाबूजी ? हें तर सारं साधंच काम !"

"म्हणजे...? छान ! मला सैपाकी होण्याएवढा सैंपाक येतो असं तुम्हांला वाटतं काय ? ऑफिस टाकून मी भांडीं घांशीत बसूं ? वाहवा ! वाहवा ! ! बरें...मला ऑफिसला जायचं आहे—"

ती हट्टीपणानं म्हणाली, "मला ती खोली तुम्हीं दिलीच पाहिजे—"

"वा, तुमचा कांहीं जुलूम आहे काय ?"

तिचे डोळे ओलसर झाले. ते टिपीत ती म्हणाली,

"हो, सज्जन दिसतां तुम्ही. अशा ठिकाणीं मदतीचा जुलूम करणंही भाग पडतं कांहीं वेळां बाबूजी ! अगदींच तुम्ही डोळेझांक करतां !

आधींच हिंदु स्त्रिया म्हणजे साऱ्या दुष्टांची वक्रदृष्टि, त्यांत आमच्या-सारख्या निराश्रित तरुणी म्हणजे तर त्यांचे बळी...! दया करा, मला आसरा, निवारा द्या ! पुन्हा एकवार सांगतें, मी चांगल्या सज्जनाची कन्या आहें. मी तुमच्या सामानाला हात नाहीं लावणार ! ”

पुढें ती बोलली नाहीं. पण मान उचलून तिनें त्याच्याकडे पाहिलें. ओहो ! डोळे केवढाले मोटे अन् त्यांतली तपकिरी छटा किती छान होती ! भिवया दाट, काळ्याभोर अन् नाकाच्या अग्रभागीं एकमेकींस भेटलेल्या ! वस्त्र मलीन पण वर्ण कसा निर्मळ होता ! मुद्रा गंभीर, ओठ मिटल्यासारखे, केंसांचा आंबाडा मानेच्याही खालीं पाठीवर पडला होता. वय ? अवघं सतरा, फारफार तर अठरा असेल !

त्या आर्जवी नजरेला नकार देण्याचं धैर्य सतीशला झालं नाहीं. तो म्हणाला, “ ठीक. रहा तुम्ही तेथें. पण फार खराब आहे ती जागा— तुमचं नांव काय ? ”

“ तिलोत्तमा...म्हणत होते लोक मला...! खराबीचं काय ! आत्तां साफ करून टाकीन. बरं, एक परवानगी द्या आतां. ”

“ आतां काय आहे आणखी...? वाढतच चाललं तुमचं एकेक ! ”

“ रागावूं नका बाबूजी...दुसरं कांहीं नाहीं एक विनंति—”

“ चटकन् सांगा—! ”

“ कांहीं नाहीं...! दोन दिवसांचं काम पडलं आहे तें मी करून टाकतें इतक्यांत ! उपकारकर्त्याला मी फिकिरींत राहूं देणार नाहीं...”

सतीशच्या उत्तराची वाट न पहातां झटकन् ती पदर आंवरून बाथरूम-कडे गेली व चहाचीं भांडीं तिनं साफ करायला आरंभ केला.

“ नको, तिलोत्तमा...तुम्ही नका करूं—” तो संकोचून म्हणाला, “ माझं स्नान व्हायचं आहे, जा आतां...ही खोलीची किल्ली ! ”

तिनें पांच मिनिटांत बाथरूममधलीं भांडीं काढलीं व तो स्नानाला आंत गेला...

बाहेर येतो, तों सारी खोली साफसूफ करून तिलोत्तमा अस्ताव्यस्त पडलेल्या कपड्यांच्या सुंदर घड्या घालीत होती...टेबलावरचीं पुस्तकं नीट लावलीं होतीं...सिगारेटचीं थोटकं, राख सारं नाहींसं झालं होतं...

तो ओशाळून म्हणाला,

" तिलोत्तमा...तूं–माझ्या घरीं असले कष्ट करूं नकोस ! मला संकोच वाटतो..." बहुवचन केव्हां सुटलें हें त्याला समजलेंदेखील नाहीं.

ती हंसली अन् म्हणाली,

" मी रोजही करीन तुम्हांला पसंत असलं तर...! ठरवतां का पाहा मला ? मला तुम्हीं पैसे देऊं नये ! मी तुम्हांला भाडं देणार नाहीं ! सौदा मान्य आहे...? "

सतीशनें या वेळीं मात्र तिलोत्तमाकडे स्नेहार्द्रतेनें पाहिलें, तों तिच्या गंभीर मुद्रेवर थोडेसें समाधान दिसूं लागलें होतें—

* * *

ऑफिसमधून परत यायला त्याला फार उशीर झाला...दाराशीं येतो तों मंजुळ स्वर त्याला ऐकूं आले. अरेच्या ! त्या बंगाली छोकरीला जागा दिली होती नाहीं का ? पुढें होऊन पहातो तों " जय हे जय हे " ही जन्मभूमीची प्रार्थना ती हळूहळूं गात होती ! खोली अगदीं स्वच्छ झाली होती ! मुग्धपणें तो ऐकत उभा राहिला. नंतर हळूंच वर जाऊन त्यानं बत्ती पेटवली. प्रकाशाची तिरीप अंधेरलेल्या जमिनीवर पडलेली पहातांच तिलोत्तमा हातांत दोन भांडीं घेऊन वर चढूं लागली. दारांतून तिनें पाहिलें तों तो बिछाना टाकीत होता...

" बाबूजी हें घ्या—" मंजुळ शब्द आले.

" कोण तूं ? काय आणलं आहेस ? "

" थोडी...मासळी...अन् भात ! सैंपाकी गेला ना ? म्हणून..."

" छान् ! पण मी जेवून आलों खानावळींतून. शिवाय मी तर ब्राह्मण आहें. मासळी खात नाहीं मी...थॅंक्स–तुमची जात ? "

" ओ...नो मेन्शन्...बाबूजी, मीसुद्धां ब्राह्मणच आहें; पण बंगाल्यांत ब्राह्मणांना मासळी खाण्याची संवय असते...निषिद्ध नाहीं ती ! " जरा थांबून ती म्हणाली, " मला माफ करा बाबूजी...जात विचारलीत तुम्हीं...पण मी ब्राह्मण नव्हे आतां ! फार निराळी जात आहे माझी. "

" म्हणजे ? "

" म्हणजे...म्हणजे...ईश्वराची कृपा नसलेल्या अभागी लोकांची अन्नासाठीं देशोधडीला लागलेली मानवांची एक दुर्दैवी जात आहे... त्यांतली मी एक..." मग तिच्या डोळ्यांतून टच्कन् पाणी आलें.

" अशा बोलण्यानं काय समजूं ? खरं सांगा, तुम्ही कोण ? "

" एक अनाथ, दुर्दैवी स्त्री..."

" शिक्षण किती झालं ? कुठं होतां ? एकट्या कां राहतां अशा...? "

ते प्रश्न ऐकून तिलोत्तमेचे ओंठ थरथरूं लागले...नाकपुड्या, डोळे तांबूस झाले...छातीचें स्पंदन जोरांत सुरू झालें, पायांत जणूं कांपरें शिरलें...ती कंठाशीं येणारा हुंदका परतवीत कशीबशी हंसली...किती करुण उदास हास्य...रडण्यापेक्षांही अधिक दुःख व्यक्तवणारें ! सतीश विरमून म्हणाला, " मला माफ करा. तुम्हाला त्रास द्यावा असा माझा हेतु नव्हता. "

" त्रास नाहीं...पण जाऊं द्या बाबूजी ती कर्मकथा...मी आणखी विचारूं एक ? रागावणार नाहीं ना ? सांगूं ? "

" जरूर ! "

" खानावळींत अन्न बरं होतं ? "

" कसलं बरं ? तांदूळ नांवाचं कोणचं तरी लालभडक धान्य शिजवलं होतं त्यांनीं. काट्यासारखा पोटात तो भात टोंचतो ! गहूं घाणेरडे अन् दामटी चळलेले अगदीं ! तेही भरपूर नाहींत. तेव्हां त्यांत लाल ज्वारी, सातू वाटेल ते मिसळून रोटले बनवले होते ! कसल्या झाडाची पालेभाजी होती ओळखू आली नाही. तूप बहुतेक गेल्या वर्षी कढलेलं असावं ! आमटींत तर बुडी मारूनसुद्धां डाळ सांपडणं कठीण; असा बेत होता ! आई येईपर्यंत काय करायचं ? हाल आहेत झालं......! "

" ओहो ! अन् पैसे किती या अपूर्व जेवणाबद्दल ? "

" दोन रुपये रोज...! पण काय करणार ? नोकरगडी, मोलकरीण साऱ्यांचा संप...! आई येऊं शकत नाहीं आणखी...! "

" आपली पत्नी ? माहेरीं गेल्या आहेत का ? "

अडखळत तो म्हणाला, " छे...लग्न नाहीं झालं माझं...अजून ! कशाला या महागाइत उगीच ! "

ती इकडून तिकडे अस्वस्थपणें फिरत होती. जरा वेळ तिच्या मनाची चलबिचल स्पष्ट दिसत होती. बोलायचं असेल तिला कांहीं तरी...पण पुन्हा ते शब्द परतत होते शरमेनें. अखेर ती म्हणाली, "मी एक विनति–"

" हं—"

" आपण सामान आणून द्या दोन रुपयांचं रोजच्यासाटीं त्यापेक्षां ! मी सुंदर स्मोई करून देत जाईन त्या अन्नाहून ! एवढं ऐकावं माझं तुम्हीं...बाबूजी, मी...बनवूं शकेन..."

" पण उगीच तुम्हाला हे श्रम कां ? अन् त्यांत काय फायदा ? "

आता मात्र तिला अश्रु आवरेनासे झाले...ती स्फुंदत म्हणाली, " अगदीं कसं सांगायला लावतां सारं...? नाहीं का ध्यानांत येत ? मी शतदरिद्री आहे बाबूजी ! मला रेशन मिळत नाहीं पैशावाचून, पैसे मजजवळ फार नाहींत. आजपर्यंत बांगड्या विकल्या होत्या त्यावर जगलें ! आतां मी उपाशीं मरणार–ते या दोन रुपयांत तुम्हांला जेवण करून उरलंसुरलं मी जेवून राहीन म्हणत होतें..."

पुढें ती बोलली नाहीं. मान वळवून झपझप जिना उतरून ती खालीं गेली...सतीश चोरपावलांनीं खालीं गेला व त्या पडद्याआडून त्यानं हळूच पाहिलं...एका घोंगडीवर पडून ती मोठ्यानं हुंदके देत होती...! सतीशनं तिची विनंति मान्य करायचं ठरविलं...

* * *

सतीश एक अविवाहित युवक ! तिलोत्तमा एक सुंदर तरुणी, तेथें आकर्षण उत्पन्न झालें ही सांगितल्यावांचूनही कळणारी गोष्ट आहे !...

सतीश तिला सामान, शिधा देई...आपल्या छोट्या खोलींत ती रसोई तयार करी. बंगाली पदार्थांची मेजवानी सतीशला मिळू लागली.

अन्न स्वच्छ, रुचकर होई. भाडींकुडीं लखलखीत असत. त्याची खोली निर्मळ असे...अन् ती सर्व सेवा ती बंगाली तरुणी न बोलतां मूकपणें करीत असे !...तिचीं आलत्यानं रंगलेलीं लालचुटुक पाउलें लगबगीनं इकडे तिकडे फिरताना दिसत त्याला ! लांबसडक मोकळे केस नित्य पाठीवर विखुरलेले असत—कारण ती रोज न्हात असे ! गोऱ्यापान मुखमंडलाकडे सतीशची दृष्टि खिळून जाई. हळुहळू त्याला स्पष्ट समजलें कीं त्याचे मन तिच्यावर जडूं लागले होते. पण तिचं ? कोणास ठाऊक ! प्रेमिकांना अगदीं तरुण मन जाणण्याची विलक्षण युक्ति साधलेली असते असं गृहीत धरून चालूं हवं तर, तरी पण, त्याच्या अशा शोधक दृष्टीलाही तिचं मन समजूं शकत नव्हत !

डोळे मोठे, काळेभोर, कबूल ! पण अगदीं निर्विकार होते ते ! त्यांत भावना उमटली तर फक्त कारुण्याची, दुःखाचीच ! तारुण्य ठायीं ठायीं ओसडून राहिलेलें, पण तिलोत्तमेला त्याची जणु आठवणच नव्हती...! तरुणीला सुलभ असे लाडिक शब्द नाहींत, नवयौवनाला साथ करणारें मुग्धमधुर हास्य नाहीं किंवा लज्जेनं रंगलेले गुलाबही गालावर नाहींत ! प्रमदेला शोभून दिसणारा अवखळपणा, खोडकर नजर, ऐटबाज गति... कांहीं एक नाहीं...शब्द गंभीर ! मुद्रा शांत ! चेहरा उदास, वृत्ति कसं तरी जगायचं अशी, चालणं जड भारी. जणूं तारुण्याचं सारं माधुर्य कोणीं चोरूनच नेलं होतं तिच्या व्यक्तित्वांतून ! देह तरुण...मन उजाड, वृद्ध ! तनु लतिकेप्रमाणे कोंवळी...पण अंतःकरणाचं वठलेलं खोड असल्याप्रमाणें खिन्नतेंत जगणारी ती रूपसुंदरा...! सतीशचं मन तुटूं लागे ती गाढ खिन्नता पाहून...! तो हंसून विचारी कांहीं तरी...पण ती कधींही प्रसन्न दिसत नसे.

महिना अशा प्रकारें गेला...मोलकरणीचे, गड्याचे, सैंपाक्याचे मिळून पंचवीस रुपये वांचले होते सतीशचे. परंतु तिलोत्तमेला पैसे कसे द्यावे ? ती तर त्याची प्रियतमा...! तिला ' वेतन ' द्यायचं; पण मग

तिचे आपणासाठीं चाललेले अपार श्रम? नुसते श्रम नाहींत...किती काळजीनं, किती निर्मलतेनं नि किती जिव्हाळ्यानं ती हें करते... अन् मीं तिला सरपणाच्या खोलींत टेवली आहे अजून...! तो विचार करीत होता.

त्या दिवशीं तिलोत्तमा त्याची खोली साफ करीत होती. तो सारखा टक लावून पहात होता...पण तिचं लक्ष नव्हतं मुळींच. काम बरं नि आपण बरं ही तिची वृत्ति...त्याला मनांतलें युद्ध सहन होईना; अखेर तो म्हणाला,

" तिलोत्तमा—थांब जरा...मी तुला कांहीं सांगणार आहें. "

तिलोत्तमेनं टेबलावरचीं पुस्तकं नीट लावीत म्हटलं,

" काय हुकूम आहे? बोला, लक्ष आहे माझं..." परंतु तिनं वर पाहिलंही नाहीं. सतीशच्या हृदयांत हुरहूर दाटूं लागली. पुढं होऊन त्या खिन्न, परंतु सौंदर्यशाली युवतीला हृदयाशीं धरावं असाही एक विचार त्याच्या मनांत आला...हो, त्यावाचून ती आपलं मन खुलं करणार नाहीं कधीं; पण त्यानं फक्त म्हटलं,

" इकडे बघ तरी जरा. ठीक; बैस खुर्चीवर तेथें. तिलोत्तमा, मी लवकरच लग्न करणार आहें. एकटं राहायचा कटाळा आलाय् मला—"

निर्विकारपणानं ती उद्गारली, " छान होईल. खरंच मला त्यामुळं एक नोकरी मिळेल आणखी..."

" कसली? "

" बाईसाहेबांची मी सेविका होईन. बाबूजी...मला खूप तऱ्हेच्या छान वेण्या बांधतां येतात, फुलं खूप प्रकारानं रचतां येतात...मी त्यांचे कपडे शिवीन...आणखी बाबूजी!...तुमच्या बाळांना देखील मी संभाळीन!...पण मला येथून काढून टाकू नका बाबूजी! "

सतीशला आपली मनीषा या सरळ भावनेपुढें उच्चारणेंही अशक्यप्राय वाटूं लागलें...ती तर अधिकच गंभीर झाली होती अन् खिडकींतून एक टवटवलेल्या कळ्यांचें फुलझाड दिसत होतें तिकडे पहात होती. तो छद्मी-पणानं उद्गारला, " लहान मुलांचं तुला कसं जमणार काम? "

" कां ? मलाही तान्हीं भावंडं होतीं, बाबूजी. माझा अरविंद वर्षाचा होता तो...माझ्या बहिणीचा मुलगा...तो रविकर चार वर्षांचा छोकरा न् घोषलांचा बिपिन...बोसांची कल्पना...सगळीं मुलं माझ्याजवळच असत दिवसभर बाबूजी ! "

पूर्वायुष्याबद्दल ती हें आत्तांच प्रथम बोलली होती...पण चुकून बोलल्याप्रमाणें ओंठ आवळून ती उठलीच एकदम...अन् म्हणाली,

" माफ कीजिये बाबूजी !...असा केव्हां तरी तोल सुटतो माझा... बोलतांना...रागावूं नका. बरं, मी जातें..."

ताड्कन् ती जाऊं लागली. दार एकदम बंद करून तो म्हणाला,

" नाहीं जायचं ! नेहमीं मी कांहीं बोलूं लागलो कीं पळून जातेस ! मी काय वाघ आहें का इतकं भ्यायला—? "

ती पुटपुटली, " वाघ बरा...पण...नको बाबूजी...दार उघडा. मी अनाथ आहें, दुर्दैवी आहें. तुमच्या घराच्या सावलीला उभी राहिलेली एक भिकारीण आहें...तुम्ही...नको बाबूजी...असं पाहूं नका..."

" मला भितेस तिलोत्तमा ? " सतीशनं अखेर विचारलं.

" न...नाहीं...भीति कसली ? देवाची भीति वाटत नाहीं बाबूजी कुणाला ! दैत्यांची वाटते......पण लोक तुम्हांला माझ्या पायीं दूषणं देतील—दार उघडा ना ? "

" नाहीं ! एक विनंति ऐक—"

" काय...? "

" तूं कोण आहेस ? कुठून आलीस ? तुझं लग्न झालेलं आहे का ? मला सांग एकदां सगळं !..."

" कशासाठीं ती दुर्दैवाची कुळकथा पाहिजे तुम्हांला...? "

त्याला मन आवरेनासें झालें. मोहाचा क्षण आला होता...ते लांब सुंदर मऊमऊ कैंस जणूं त्याला बोलवीत होते...ती तरुण छोकरी जणूं आव्हान देत होती...पण सतीश चांगल्या वर्तनाचा होता. सद्विवेकाची

जागृति त्याच्या मोहवश मनाला एकाएकीं आली–तिचा हात त्यानं हातांत घेतला अन् मृदुपणें म्हटलं,

" तिलोत्तमा !...संध्याकाळीं सांगेन मला ती हकीकत कशाला हवी ती !...मी मित्रही होऊं शकत नाहीं का तुझा ? संध्याकाळीं...... आपण सिनेमाला जाऊं...येशील ?—"

" मी ? आपल्याबरोबर ?...छे...भलतंच—"

" भलतंच काय ?—मी नेणार तुला !...मग फिरायला जाऊं अन् तिथं ती हकीकत मला सांग तूं तुझी—तुला इंग्रजी आवडेल का ?... समजतं तुला ? "

" थोडंसं ! माझी कसली दरिद्री पोरीची आवड ! आपण ठरवा काय तें—"

" पण सांगितलंस तर बिघडणार आहे का कांहीं ?—"

त्याचा चिडका आवाज ऐकून ती म्हणाली, " न्यू थिएटर्सचा असेल तर बघू आपण. रागावतां काय ? बरं, सारं कबूल. पण हात सोडा अन् जाऊं द्या मला !...असं करणार असाल तर मी लाकडांच्या खोलींत लांकडासारखी जळून गेलेली काय वाईट ! "

तो दचकला...पण मग त्यानं कडी काढली अन् म्हटलं, " मीं कांहीं पापी हेतूनं दार लावलं नव्हतं ! तूं नेहमीं पळून जातेस–म्हणून. पण...तुला खर्चाला हे पचवीस रुपये घे सध्या—"

" पैसे ? नको बाबूजी...मी पैसे घेऊन कामं करणाऱ्यांपैकीं नाहीं... मीं तुमचं काम केलं म्हणून देतां ? पण...मी कशी घेऊं ? छे...तुमचं अन्न खाऊन तर जगलें...कुणाला ठाऊक कुठें असतें या वेळीं ! नको, बाबूजी...पैशानं मला मारूं नका–अच्छा..."

त्यानं दार उघडलं...अन् ती पिंजऱ्यांतून सुटलेल्या पांखराप्रमाणें भुर्रकन् निघून गेली.

* * *

संध्याकाळीं हातांत एक बंडल घेऊन तो आला...साड्या होत्या दोन चांगल्या त्यांत! तिच्या हातांत तें त्यानं दिलं अन् म्हटलं, " चल लवकर ! हें नेस..."

" हें काय बाबूजी ? नको मला...तुम्ही साडी देऊं नका......"

" नाहीं मी ऐकणार !...चल, लवकर तयारी कर...ऐकायचंय का नाहीं ? नाहीं तर मी खानावळींत जातों आपला उद्यांपासून ! "

" बरं, तुमची मर्जी—"

ती खालीं गेली अन् पंधरा मिनिटांत वर आली. ओहो! ओहो! गोऱ्यापान देहलतेवर तो डाळिंबी साडीचा रंग काय गहिरा दिसत होता! पांढऱ्या गुलाबावर लाल छटा शोभावी तसा!...वेणीची सैलसर गांठ मानेच्या खालीं स्वच्छंद विसांवली होती पाठीवर! जणू तिच्या पाठीस लागलेले दुर्दिन संपलेले पाहून ती पाठीराखी मैत्रीण खुपीनं हंसतच होती!.. तांबूस ब्लाऊजही साडीबरोबर होता...ती बंगाली पद्धतीनं साडी नेसली होती, त्यामुळें पायांवर आडवे कांटाचे पदर बरेच आले होते. तो जर लालबुंद रंगाला शोभत होता...मंगळाच्या ताऱ्यासारखी तिलोत्तमा चमकते आहेसं वाटतं......तो मुग्ध होऊन पहात राहिला, तेव्हां ती खालीं मानेनें म्हणाली,

" चलावं—"

* * *

त्या मऊ हिरवळीवर बसल्यावर ती म्हणाली,

" हाच का सिनेमा ?—"

" नाहीं. अवकाश आहे अद्याप तासभर...तोंवर बोलूं या. इथें कुण्णी नाहीं. मी माझं मनोगत सांगणार आहे...सांगूं ? "

" जी–हां–कहिये-—"

" तिलोत्तमा ! अजून नाहीं कळलं ? माझं मन तुझ्यावर जडलं आहे... तूं माझी होशील— ? सांग...सांग मी तुला चांगलं वागवीन. पण...तुझं मन खुलं केलं पाहिजेस तूं..."

तिलोत्तमा स्तब्ध झाली. उमलूं लागलेलं फूल पुन्हां जणूं कोमेजलंच... नुकती उत्पन्न झालेली कोमल भावना डोळयांतून हरपली अन् नेहमींची रूक्ष, उदास, शून्य भावनेची छाया तेथे आली...ती म्हणाली,

"बाबूजी.. कसं...सांगूं? तुम्ही...म...मला...फार...पण नाहीं. मी तुमच्याबद्दल असं बोलण योग्य नाहीं...बाबूजी...मला कल्पना होती तुम्ही असलं कांहीं विचारणार ही...माझ्यानं सारं सांगवत नाहीं...पण ...मीं...तुम्हांला...नाहीं म्हणणं बरं...!"

"काय? माझ्या विनंतीचा अव्हेर? माझ्यापूर्वी तुझं मन कुणावर जडलं आहे तर—!"

"नाहीं, नाहीं—"

"मग कां नाहीं म्हणावंस? मी काय उमदा नाहीं? का वर्तनाचा खराब आहें, का बदमाष आहें? बोल..." तो चिडून ओरडला व त्यानं तिचे खांदे धरून गद्गद् हलवीत म्हटले, "सांग!—मला कारण कळलं पाहिजे!"

ती हंसून म्हणाली, "हां हां, सबूर...! बाबूजी, रागावतां किती...? माझी एक गोष्ट ऐका...तुम्ही फार फार चांगले आहांत...पण माझं दैव फुटकं आहे म्हणून—"

"फुटकं दैव म्हणजे? अन् मी दुरुस्त करणार नाहीं का तें?"

"नाहीं...कुणी नाहीं! त्या ईश्वरानं घातलेल्या घावांना बरं करणारं कुण्णीदेखील सांपडायचं नाहीं. बाबूजी...! हें घ्या, वाचा...माझ्यानं सांगवत नाहीं तें सारं...! अन् मग विचारा काय तें..."

पोलक्याच्या गळयाशीं हृदयाजवळ लपवलेला एक कागद तिनं पुढं टाकला. त्यांत हिंदीमध्यें लिहिलं होतं...

"बाबूजी...मी कोण म्हणून छप्पन्नदां विचारतां! मी एका जमीन-दाराची कन्या आहें, नौखालींतल्या! चाळीस माणसं घरांत होतीं...किती श्रीमंत होतों आम्ही! किती सुखी कुटुंब आमचं! पण दुर्दैवाचा फेरा आला.

गुंडांची वक्र दृष्टि आमच्या छोट्या गांवाकडे वळली. अत्याचारी गुंडांनीं खरोखर सारा गांव उध्वस्त केला...माझ्या बाबांना, काकांना...घरांतल्या सर्व पुरुषांना माझ्यासमोर ठार केलं...! कोणी प्रतिकार करायला येईल त्याला ठार केलं...लहान मुलं मारलीं...! अंगावर आठवणीनंसुद्धां कांटा येतो बाबूजी...! माझा छोटा अरविंद...माझा भाऊ—! आईच्या कडेवरून ओढून त्या दुष्टांनीं...तुकडे केले त्याचे ! आईचं, बहिणीचं कुंकू जोड्यानं पुसून टाकलं...अत्याचार केले. फरफर ओढीत त्यांना कुठं नेलं देव जाणे...बुरख्यांत त्या गेल्या ! मेल्या, का आहेत कुणास ठाऊक ! मी एक जंबिया घेऊन त्यांतल्या एकाला लोळवलं...त्यावर चिडून चारजण धांवून आले. हातांतून जबिया गेला...अन् आयुष्याचं शीलही गेलं... लिहूं नये; पण लिहितेंच...देवमूर्तीसाटीं मनाचं मंदिर सजवलं होतं... तेथें दैत्यांनीं धूळधाण केली...म...माझ्यावर...एका जमीनदाराच्या सात्त्विक, शुद्धाचरणी कन्येवर एका परधर्मी नीचानं जुलमानं...आई ग ! नको ती आठवण !

"समजलंच असेल आतां तुम्हांला ! मी बहिष्कृत आहें...जातिबहिष्कृत, पावित्र्यबहिष्कृत...आहें ! तुमचं मन...मला समजतं...पण हें पायाखालीं तुडवलेलं फूल—माझं मन—कसं मी तुम्हांला वाहूं ? देशोधडीं लागून मी इथें आलें. सतीश ! देवानं आपली भेट फक्त सहा महिन्यांपूर्वीं केली असती तर किती आनंदानं मी तुमची पत्नी झाले असते. पण तेवढी कुठें मी सुदैवी आहें ? मला आतां कुणाचीही पत्नी ह्या भ्रष्ट देहानं होतां येत नाहीं. सतीश, रागावूं नका. मला असं वेगळंच राहूं द्या ! एका कोंपऱ्यांत राहून दुरूनच पाहीन...अन् तुमचे पाय उमटलेल्या जागीं मी हळूच वंदन करीन. तोच आतां विसांवा—कुठें नोकरी लागेपर्यंत मला थारा द्या. —तिलोत्तमा बानर्जी."

पत्र संपवून हतबुद्ध होऊन त्यानं वर पाहिलं अन् म्हटलं, "घरीं चल !" त्याचंही हास्य मावळलं होतं. उल्हास गुप्त झाला होता... पावलं जड पडूं लागलीं होतीं. अन् शून्यपणें ती मागून चालत होती... जणूं तजेलदार वृक्षाची छायाच !

एका लुकलुकत्या दिव्याच्या प्रकाशांत घड्याळाचे कांटे पुढें पुढें चालले होते. त्याचे विचारही फिरत होते सारखे. ‘ जुलमानं...अत्याचार झाला, तरी स्त्रीच दोषी ? दोष खरा पण तिचं अबलत्व, प्रतिकाराला कमी पडणारी ताकद् हाच दोष म्हणा हवं तर...त्या एका क्षणासाठीं जिनं आयुष्यभर वैराग्याचा निर्णय घेतला तें मन अमंगल कसं ? छे, चुकतंय काहीं तरी ! एक सुशील कन्या...पण एकच कां ? अनेक कन्या, कुलीन, घरंदाज, रूपसुंदर मुली नौखालींत भ्रष्ट झाल्या...त्यांची नियति काय हीच ? त्यांचीं घरदार जाळलीं, आईबाप, भाऊ ठार केले...भावंडें मारून टाकलीं अन् त्यांच्यावर—अरेरे ! नीचांचा सूड घेतला पाहिजे... छे ! राक्षसी गोष्टींचा दोष पापभीरु स्त्रियांवर नाहीं. अशा स्त्रियांना परत मार्गाला लावायला पाहिजे. परत अशा कुमारिकांना संसारांत आणून मानाचं स्थान दिलं पाहिजे. त्यासाठीं एकच काय, अनेक सतीश छातीचा कोट करून पुढे आले पाहिजेत, अन् त्या वंचित स्त्रियांच्या उद्धाराचा प्रयत्न केला पाहिजे. अन् त्या दुष्टांना शासन ! ’ सारखा विचार—

ती सकाळीं आंत येतांच तो आवेगानं म्हणाला,

“ बस् ठरलं ! एकच नव्हे, कितीक सतीश तयार करणार मी यापुढें अन् पहिलं उदाहरण मी समाजाला घालून देणार ! ”

“ कसलं—? ”

त्यानं दार बंद करीत म्हटलं, “ तरीही मी तुझ्याशींच लग्न करणार आहें ! एकच सांग...तुझं मन...माझ्यावर आहे ना ? ”

तिच्या गालावर रक्तिमा उमटली...ती अगदीं हळू पुटपुटली,

“ मी !...खरंच ?...तरीसुद्धां मी तुमची पत्नी ?...हें भाग्य माझं खरंच आहे का ?...मला तरीही तुम्ही हृदयांत जागा देतां ? ”

पहातां पहातां तिच्या नजरेतून अश्रू ठिबकूं लागले...पण तो वर्षाव त्यावेळीं दुःखखेदाचा नसून हर्षमोदाचा होता !

—✱—

# पुढलं दार ! मागलं दार !

अनिल बाहेरून आले, पण माझ्याशीं एक शब्दसुद्धां न बोलतां कोचावर पडले. मीं दोनतीन प्रश्न विचारले, पण उत्तर मिळालं नाहीं. उलट रुंद कपाळावर आंठ्या पडल्या बऱ्याच. मुकाट्यानं चहा नेऊन दिला नि कामाला लागलें. मीं तरी काय करायचं ? रोजचंच झालं होत हें.

खरोखर आतांशा अनिल फारच चिडचिड करीत. पानावर बसले कीं जाडे, तांबूस तांदूळ नि लाल भाकरी पाहून दातओठ खात; रॉकेलच्या अभावीं मिणमिणीत दिवे बघून 'रेशन ऑफिसरला लेकाला फाशीं द्यावं !' म्हणून संतापानं मुठी वळत. खरं म्हणजे शभरसवाशें रुपये पगार असणाऱ्या साऱ्यांचीच ही दैना होती. पंचवीसतीस रुपये भाडं भरून एकदीड खोली राहायला मिळाली होती हेंच भाग्य. सारा पगार खर्चीं पडला तरी बरंसं जेवण किंवा नीट कपडा मिळणं या महागाईनं मुष्कील झालं होतं.

आंचेवर पदार्थ शिजत असला कीं त्याची वाफ दबून राहात नसते. आजहि काम गरमागरम होतं. मीं हळूच म्हटलं,

" प्रकृति बरी नाहीं का, अनिल ? कामाचा त्रास फार झाला होय ? "

ते खिन्नपणें म्हणाले, " तसं नाहीं, अलका ! पण इतक्या प्रामाणिकपणानं दिवसभर राबलं तरी चीज होऊं नये का ? उद्यां तुझं बाळंतपण आलंय्. आमचा मित्र बंड्या दामलेच नवा रेशन-ऑफिसर झाला आहे. आज त्याला भेटून तांदूळ मागितले थोडे, तर त्यानं पन्नास रुपये लांच मागितली ! अन् वर म्हणतो, ' मित्रा ! अरे बाबा, या दिवसांत गरिबी

हा गुन्हा आहे नि बाळंतपण कौटुंबिक गुन्हा आहे ! संततिनियमनाचीं पुस्तकं देतों हवीं तर तांदुळाऐवजीं !' सांग अलका, कां चीड येऊं नये जिण्याची ? प्रामाणिकपणानं कष्ट करून पोट भरणाऱ्यांचे हे हाल ! आणखी बंडोपंताची ऐट बघ. सुरेख घर, वाटेल तितकं धान्य, हवी तेवढी साखर, शिवाय पैसे चरतो ते वेगळेच ! त्या फौजदार मटंग्यांचीदेखील चलती आहे. वाटेल तसे पैसे खातो. खरोखर हे अधिकारी साऱ्या जनतेचे शत्रू आहेत. शूट केलं पाहिजे या देशद्रोही लोकांना ! "

त्यांच्या संतापाचा पारा फारच चढला. मलाहि बाळंतपणाचं संकट दिसत होतंच. वास्तविक मुलांना कंटाळण्याइतकीं कांहीं आमचीं मनं संसाराला विटलीं नव्हतीं; पण परिस्थितीचा विचार करावाच लागतो माणसाला. तांदूळ मुळींच नव्हते व गडीमोलकरीण हुडकून काढायचं काम मध्यमवर्गीयाना कोलंबसानं अमेरिका हुडकून काढण्याइतकंच बिकट होऊन बसलं होतं. मीं उसनं हंसून म्हटलं, "इश्श ! मग रागावायचं कुणावर इतकं ? अन् बंडोपंतांशीं तरी उगीच तुलना कशाला ? आपली कशी झाली तरी कष्टाची कमाई आहे, प्रामाणिकपणाची आहे. चहूंकडे जास्त पगाराच्या नोकरीसाटीं खटपट करतां आहां, लागेल एखादी छानशी नोकरी. हेहि दिवस जातील; आणि त्या बंडोपंतांचं पुरे झालं. परवां म्हणे त्या खटमल व्यापाऱ्यानं काळ्या बाजारानं धान्य विकलं तेव्हां पांच हज्जार रुपये बंडोपतांना मिळाले. इश्श ! असं का एकदम श्रीमंत व्हायचंय् ? आपली कष्टाची भाकरी ठीक. "

अनिल कडवटपणें हंसले व उद्गारले, " हेहि दिवस जातील ! अन् कष्टाची भाकरीहि जर धड मिळत नाहीं, तर असं श्रीमंतहि होणं काय वाईट ? तुमचे तरी हाल थांबतील सारे. "

माझं मन एकदम चरकलं. समोर गांधीजींचा फोटो होता. तिकडं पाहात मीं जणुं त्यांची मनांतल्या मनांतच क्षमा मागितली. अनिलच्या नि माझ्या सहजीवनांत आतांपर्यंत त्रास असेल, गरिबी, कष्टहि होते, परंतु मलीन विचारांची झळ त्याला मुळींच नव्हती कधीं लागली ! आमच्या मनाची दौलत खरंच अगदीं निष्कलंक होती आजवर. तेंच

माझ्या संसाराचं वैभव होतं. जवळ सर्प दिसला कीं माणूस जसं एकदम दचकून मागं सरतं, तसा माझा त्यांच्या हातांत गुंतलेला हात एकदम सोडवून घेऊन मी दूर सरलें अन् म्हटलं, " छे ! छे ! हे काय भलतंच मनांत आणायचं ? नको बाई तो अमंगळ विचार. मीं कधींतरी कामाकष्टाला मागं घेतलंय्, का कुरकूर केली आहे ? माझे कसले हाल बाई ? बाळंतपणाचंच म्हणायचं असेल तर मी माहेरीं जावं म्हणतें या वेळीं. बाबांचं घरचं शेत आहे, म्हैस आहे. निदान भाजीभाकरी तरी मिळेल ना चांगली ? आमच्यासाठीं नको बरं का कांहींतरी करून ठेवायला ! "

" बरं बरं, झोंप आतां ! " ते हंसत म्हणाले.

माहेरीं बाळंतपणाला गेलें आणि छोटा अजय सात महिन्यांचा होईपर्यंत मला निघतां आलं नाहीं. माझी प्रकृति बरीच बिघडली होती तरी एकदांसुद्धां या आठ महिन्यांत येणं झालं नव्हतं. आमच्या नव्या बाळाच्या पायगुणानंच कीं काय कोण जाणे, पण नवी छानदार नोकरी लागल्याचं पत्र आलं होतं तो झाल्याबरोबर. नवं घरहि मिळालं असल्याचं लिहिलं होतं ! इतकंच नव्हे, तर सैंपाकी नि नोकरहि ठेवल्याचं लिहिलेलं वाचून तर मी कधीं जातें नव्या घरीं असं मला होऊन गेलं ! आणि एखादीं चिमणी भुर्रदिशीं उडून जावी तसे ते सातआठ महिने आमच्या जीवनांतून पाहतां पाहतां भुर्रदिशीं उडून गेले अन् एक दिवस अनिलांची स्वारी आपला लवाजमा न्यायला येऊन उभी राहिली. मी भांबावून पाहात राहिलें ! सुरवंटाच्या अळीचं रूप फुलपांखरूं झाल्यावर अगदीं कांहीं निराळंच दिसतं, तसे मला अनिल अगदीं वेगळे दिसले. पूर्वी मानेवर उस्तरलेला सुती कोट, मळके पायजमे, कोकणी वाहाणा घालणारे हेडक्लार्क अनिल आज दुसरेच कुणी बनले होते. उंची फ्लॅनेलचा निळा सूट, कोरं रिस्टवॉच, चकचकीत बूट, कितीं शोभत होतं त्यांना ! मीं एकटक पहात म्हटलं, " एवढी नोकरी तरी कोणती आहे बाई ? बराच थाटमाट दिसतो ! "

ते हंसून म्हणाले, " कळेल घरीं गेल्यावरच ! तोंपर्यंत कांहींएक सांगत नाहीं. "

आणि नव्या घरीं पोंचतांच त्यांनीं हुकूम सोडले, "अरे जनुभाऊ, बाईसाहेब आल्या हं, त्यांच्या मर्जीप्रमाणं सैंपाक करीत जा! नव्या बाईसाहेबांना ऊन पाणी आण पाय धुवायला अन् मुलांचे बिछाने घाल!" हें सारं ऐकून बिचाऱ्या 'बाईसाहेब' इतक्या थिजून गेल्या, कीं काय सांगावं! बर्फाच्या नदींत सांपडल्यासारखं वाटूं लागलं त्यांना! हें सारं खरंच आहे कीं आपल्याला एखादं लांबलचक स्वप्न पडतं आहे याचाच बोध होईनासा झाला. सगळ्यांत मला राग आला तो अनिलचा. नाटकांत किंवा सिनेमांत विनोदी पात्राची धांदल उडावी तशी माझी गोंधळलेली स्थिति पाहून ते करमणूक करून घेत होते खुश्शाल अन् हसत होते!

आणि त्याच रात्रीं मला समजलं, कीं बंडोपंत बदलून गेले अन् त्याच जागेवर रेशन ऑफिसर म्हणूनच अनिलची नेमणूक झाली होती व खुद्द बंडोपंतांच्याच वशिल्यानं ही 'थोर' जागा मिळाली होती! तसा पगार फार होता असंहि नव्हे. मला हें समजेना, कीं पांच सहा महिन्यांत आमच्या राहणींत इतका फरक पडण्याइतका जम अनिलांनीं कसा बसवला?

एखाद्या सोप्या उदाहरणाचं उत्तर कोणत्याहि पद्धतीनं चट्कन् एकच मिळतं. तसं या प्रश्नाचा कुठल्याहि बाजूनं विचार केला तरी उत्तर एकच येऊं लागलं...अन् तें उत्तर मिळतांच खरोखरच कुणीं पळी तापवून डाग द्यावा तसं मला झालं. कुठून आलं हें वैभव? कुठला हा सगळा पैसा?...खात्रीनं बंडोपंतांच्या श्रीमंतीप्रमाणंच हा पैसा वाममार्गानं आला होता! अरेरे! अनिल, हें तुम्हीं काय केलंत? सहज माझी नजर नव्या देवघराकडे वळली. इलेक्ट्रिकच्या बत्त्यांनीं तें सुशोभित रंगीत देवघर झगझगत होतं व सुंदर शिसवी देव्हाऱ्यांत फुलांच्या सुगंधी राशींत देव सुखानं आराम करीत होते! आपलं मनच मेलं मोठं चमत्कारिक आहे. मला उगीचच भास झाला, कीं माझ्या देवपूजेच्या मूर्तींवर कसले तरी डाग पडूं लागले आहेत म्हणून. सगळाच कल्पनेचा खेळ, दुसरं काय? समोरच्या दिवाणखान्यांत टेबलावरच गांधीजींचा

मोठा हास्यमुख फोटो होता व त्याला सोनेरी चौकट लावली होती ! दुसराहि एक विचित्र भास झाला—गांधीजींचे डोळे झांकले आहेत असा ! मी टक लावून पाहतें तोंच मृदु शब्द आले,

" पाहा ना, गांधींच्या फोटोला त्या भिकारड्या चौकटीपेक्षां ही सोनेरी चौकट किती खुलते, नाहीं ? माझ्या अलकेला त्या दरिद्री, फाटक्या पातळापेक्षां हीं उंची जरीचीं लुगडीं खुलतात ना ? तरशी ! माझीं मुलं तेव्हां दीनवाणीं दिसायचीं, आतां पाहा ना त्यांचं रूप ! "

मला उत्तर सुचलं नाहीं किंवा सुचलं होतं परंतु त्याचा उच्चार करायचा धीर झाला नाहीं. मनांत म्हटलं, ' बडोपंत या जागेवर होते तेव्हां आम्हीं त्यांना नांवं ठेवीत होतों आणि आतां ?—'

हळूहळू पण निश्चित त्यांच्यांत फरक पडत चालला होता. ते अलीकडे बरेच खूप असत, थट्टामस्करी करीत. पूर्वीसारखे रंजीस आलेले कधींच दिसत नसत आतां अनिल. रॉकेल मिळेल का ? जरा बरे तांदूळ मिळतील का ? स्वच्छ पांढरे जोंधळे कधीं दृष्टीस पडतील का ?—या विवंचना आतां बिलकुल उरल्या नव्हत्या. उलट महाग रव्याचा शिरा, बारीक तांदुळांचा सुंदर भात, सोनसळे गहूं अशा सोन्यासारख्या वस्तु ज्या आम्हांला कधीं दृष्टीस पडत नव्हत्या त्यांचीहि आमच्या घरीं समृद्धि होऊं लागली होती. तळं राखील तो पाणी चाखील ही म्हण काय उगीच आहे का ? मी मात्र मनांत रुखरुखत होतें. कुठंतरी, कांहींतरी चुकतं आहे असं मला वाटत होतं. असलं मी कांहीं म्हणायला लागलें कीं अनिल सिगरेटचे भपकारे सोडून तुच्छपणें हंसत अन् म्हणत, " बस् कर तुझं रडगाणं. तुमच्या साऱ्यांच्या सुखासाठीं आम्ही दिवसभर धडपडतों तें कुठेंच गेलं ! अन् म्हणे हें योग्य नाहीं न् तें नीतीचं नाहीं ! मला वाटतं, तुला इंद्राच्या ऐरावतावर जरी नेऊन बसवलं तरी तूं कुरकूर करशील ! बायका या अशाच. कांहींहि करा, समाधानच नाहीं त्यांना ! "

हे शब्द ऐकले कीं वाटे, मनांतल्या कुठल्यातरी कोमल वस्तूला कुणी गळा दाबून मारून टाकतं आहे !...खरंच, कशाबद्दल हें माझं मूर्ख

मन नाखूष होतं बरं ? सोन्यासारखीं मुलं, प्रेमळ नवरा आणि लक्ष्मीहि सोन्याचीं पावलं उटवीत आमच्या जीवनपथाला येऊन मिळण्याची खात्री पटूं लागलेली...अन् हें सारं असून मीं कष्टी कां असाव ? खरंच का आम्ही बायका असंतुष्ट असतों ? सहज बोलतांना अनिलांनीं सप्प्दिशीं सान्या स्त्रीजातीवर एकदम चाबूक मारला—'बायकांना समाधानच नाहीं कधीं !' तें खरंच आहे काय ?

किती झपाट्यानं आमची परिस्थिति बदलत चालली होती ! पूर्वीचे विद्याव्यासंगी, बुद्धिमान्, सचोटीनं वागणारे प्रो. जोशी, हेडमास्तर बारामतीकर, देशपांडे वैद्य, चिंतोपंत क्लार्क हें मित्रमंडळ कधींच सुटलं. त्याऐवजीं मला दिवाणखान्यांत मोठ्या पोटाचे, कानांत मोटमोटीं सोन्यांचीं वळीं घातलेले व 'अरे, असा कसाला बोलते !' असलं विचित्र बोलणारे मारवाडी दुकानदार गप्पा मारतांना दिसूं लागले. एक दिवस मिशांचे आंकडे वळलेले एक गृहस्थ बुटाचे थाड्थाड् पदाघात करीत घरांत शिरले ते एकदम "दोस्त अनिलचंद, अरे बाबा फीस्ट दे ! धान्याची वॅगन आली आहे—किती कमाई या वेळीं ?" म्हणतच आंत शिरले व एकदम सलगीनं त्यांनीं पाटीवर थोपटल्यासारखं केलं त्यांच्या ! अनिलहि खुपीनं हंसूं लागले.

मी दाराआड होतें. माझा बरा ग्रह झाला नाहीं त्या माणसाला पाहून. अशा माणसांशीं अरेतुरे करण्यापर्यंत अनिलची दोस्ती ? अनिल आंत येऊन म्हणाले,

"अलका, सुंदर शिरापोहे झटदिशीं कर पाहूं. फौजदारसाहेब मटंगे आले आहेत. आतांशा आमचा—त्यांचा फार स्नेह झालाय्, अलका, मोठा दिलदार माणूस आहे !"

मी चांगलीच दचकलें. हेच का ते फौजदार मटंगे ? बंडोपंतांच्या प्रत्येक कमाईत फौजदारांची भागीदारी अन् साहाय्य असे असा कधींपासून लौकिक होता...अन् यांच्याशीं अनिलांचा स्नेह ? पूर्वी जनतेची कड घेऊन सात्त्विक संतापानं फौजदारांना चिडून शिव्या देणारा अनिलांचा जळजळीत चेहरा मला एकदम आठवूं लागला. कुठं गेली ती दीनांची

कळकळ ? ती जनतेच्या साह्याची, सहृदयपणाची भाषा कुठं आहे ? मीं त्यांच्याकडे कांहींसं रोषानं पाहिलं. माझ्या अनिलांची मोहक चर्या धारण करून, त्यांच्या प्रिय मुखवट्याच्या आडोशाला दडून कुणी दुसराच अत्यंत स्वार्थी अन् पापिष्ट माणूस माझ्याशीं बोलतो आहे असंच वाटलं. मीं एकदम म्हटलं, "आतांशे लक्षण ठीक नाहीं तुमचं ! या मटंग्यांच्या नांवानंच तुम्ही बोटं मोडीत होतां ना मागं ? यांच्याशीं तुमची मैत्री ! करीत नाहीं मी शिरा !"

बेपर्वाईनं हंसून ते म्हणाले, "राहिलं ! आचारी करील अन् रात्रीं माझी खरडपट्टी काढायला वेळ आहे पुष्कळ ! वेळ आली तर मांगाशींहि मैत्री करीन. हा व्यवहार आहे. तो मूर्ख बायकांना कळत नाहीं. तें 'खरी गृहिणी' पुस्तक नीट वाच ! 'पतिदेवाला दुखवूं नका; पती जें मिळवून आणील त्यांत संसार करा' हें त्यावरून तरी शिका !"

जणुं माझी आनंदी वृत्ति ओरबडूनच ते निघून गेले. माझा संसार दिसायला एखाद्या दमदार इमारतीप्रमाणं सुंदर होता; पण त्याच्या पायांत कांहीं अमंगल भरण भरलं जात होतं. रात्रीं मला बोलावंसंसुद्धां वाटेना. अनिलांचा पूर्वीचा रसिकपणा मला किती प्रिय होता ! पण आतांशे ते जें माझं कौतुक करीत, तें सारं मला गढूळ पाण्यासारखं वाटे. मी बराच वेळ बोलत नाहींसं बघून त्यांनीं कोंपऱ्यांतली सेफ उघडली. ही सेफ नुकतीच घेतली होती त्यांनीं. त्यांनीं हंसत एक मोत्यांची माळ काढून माझ्यापुढं धरीत म्हटलं,

"अलका, भारी बुवा रुसतेस तूं. बघ ! जाईल ना आतां राग ? लग्न झाल्यापासून तुला हवी होती मोत्यांची माळ ! कितीदां मी मनांत म्हणायचा, थोडेसे पैसे जमले कीं अलकाची ही पहिली हौस मी पुरी करीन. पण नाहीं जमलं इतकीं वर्षं. आतां–हांस ना अलका ! तुझ्या प्रसन्नतेसाठीं तर सारी आमची धडपड."

माझ्या डोळ्यांतून त्या माळेपेक्षांहि पाणीदार मोत्यांचे दाणे ओघळले एकदम ! सुशिक्षित पत्नीबद्दलदेखील पतीची हीच का भावना ? प्रत्येक

पत्नी भल्याबुऱ्या, कशाहि मार्गानं एकदां दागिने केले म्हणजे खूष होते असं कसं समजले अनिल? इतकी माझ्या हौसेची, अभिरुचीची पायरी हीनत्वाला गेली आहे का? पति घडघडीत–हो, या एकांतांत कशाला लपवून टेवूं ते दुष्ट शब्द?–पति घडघडीत पैसे खाऊन गबर होत आहे, रेशन अधिकारी झाल्यापासून पैशांचा पावसाळा बारमहाचा पतीच्या पायांशीं चालू आहे आणि या लांचेच्या पैशांतून आणलेली ती माळ मला बरी कशी वाटेल? अरेरे! अनिल, हीच का पत्नीच्या स्वभावाची पारख केलीत? माझे अश्रू पाहून अनिल चमकले. ते प्रेमळपणें म्हणाले,

"अरे! काय झालं? तुझ्या डोळ्यांत पाणी? अलका, तुझी प्रकृति बरी नाहीं का? मी माझ्या फुलाला त्रास होऊं नये म्हणून किती किती जपतों! पूर्वी तूं त्या काळोख्या खोलींत, ओल्याचिल्यांत कामं करायचीस, तांदूळ कांडूनकांडून तुझ्या हाताला घट्टे पडले आहेत अजून; खराब धान्य निवडून डोळेफोड करायचीस, एक नोकर ठेवायचेंहि आपलं सामर्थ्य नव्हतं. मला किती वाईट वाटे तेव्हां! इतक्या छानदार, कोमल पत्नीला माझ्या दारिद्र्यानं मी किती कष्ट करायला लावतों असं वाटे. पण आज आपल्याला काय कमी आहे, सांग अलका!"

"एक गोष्ट कमी आहे ना? तीच तर उणीव."

"कोणती? मोटार वाटतं? आपल्या वैभवांत आहे खरी ती उणीव."

"अनिल, बस् करा. तुमची कल्पना तरी काय आहे माझ्याबद्दल?" अत्यंत चिडून मीं म्हटलं, "माझ्या संसारांत मोठी उणीव आहे; पण... कधींची सांगेन सांगेन म्हणतें, पण धीरच होत नव्हता; अन् तुम्हांला ऐकून घ्यायला तरी कुठं वेळ आहे म्हणा! आज सांगतेंच. तुमची सदसद्विवेकबुद्धि पळून गेली आहे कुठंतरी—फार दूर! तुमचं मन मेलं आहे जसं! ही उणीव पावलोपावलीं मला जाणवते, बोचते. अनिल, कसे सात्त्विक होतांत अन् आज किती...कसे झालां आहांत? पापा-पुण्याचीसुद्धां कांहींच नाहीं का चाड बाळगूं माणसानं? नको मला असली माळ!"

माझे शब्द फार धारेचे होते. अनिल चांगलेच दचकले तें ऐकून. क्षणभर गप्प बसले व माळ खरंच परत ठेवीत म्हणाले, " हं ! कोरडा उपदेश कोणीहि करील. पैसा हा आजचा परमेश्वर आहे. उद्यां मुलांचीं लग्नं, मुलांचीं शिक्षणं सारं व्हायचं तें काय मंत्रानं होणार आहे ? आणि आतां विषयच निघाला आहे म्हणून सांगतों, तुझी ही धुसफुस मला मुळींच खपायची नाहीं. तूं, मुलं, तान्हं मूल ह्यांसाठींच पैसे मी मिळवतोंय, खर्च करतों. मला एकट्याला तीसचाळीस रुपये कुठंहि मिळतील न् पुरे होतील, समजलीस ? पण हा तुमचाच खर्च आहे सारा ! अन् त्यासाठींच तर मी पैसे मिळवतों. कळत नाहीं त्यांत बोलूं तरी नये मूर्खासारखं ! म्हणे पाप अन् पुण्य ! अलका, नीट ऐक. आजच्या या महागाईत गरिबी हें पाप आहे, पैसा हेंच पुण्य. अन् मी पुण्याईचाच संचय करतों आहें ! आलं का लक्षांत ? "

माझ्या चांगलंच लक्षांत आलं. पण काय ? अनिलचं मन खरोखरच मृत होऊं लागलं आहे हेंच ! मान फिरवून अनिल बाहेरच्या दिवाणखान्यांत जाऊन झोंपले. मला कुठली झोंप येणार ? मीं त्याना दुखवलं होतं कधीं नव्हे तें. पण हें मीं बरोबर केलं का ? पतीची अवज्ञा हेंच का पत्नीचं कर्तव्य ? आणि म्हणे माझ्यासाठींच सारं ! पैसा हाच परमेश्वर ! गरिबी हेंच पाप ! एकेक धगधगीत निखारा टाकून माझं मन पेटवून अनिल निघून गेले. मी मात्र तळमळत होतें सारखी. पूर्वी मला आमच्या त्या कोंदट खोलींतसुद्धां फाटक्या गादीवर निवांत सुखनिद्रा मिळे; पण आज या सुसज्ज जागीं निद्रामाई माझ्यावर रागावून जवळ येत नव्हती...

पुढल्या दारीं दाद लागली नाहीं म्हणून अण्णा कुबेर मागील दारीं माझ्याकडे आले. मी तुळशीला पाणी घालीत होतें. कुबेर हे आमच्या शेजारचे वृद्ध गृहस्थ. त्यांनीं अनाथाश्रम काढला होता. माझी चलती ऐकून बापडा वृद्ध मनुष्य मदत मागायला आला होता. नांव कुबेर पण वृत्ति फकिराची...ते सहज उद्‌गारले,

" अलका, नेहमीं संसारांत पुण्याईची बाजू बायकांकडेच असते. पाहा चातुर्मास सुरू झाला आहे. साहेबांनीं मला हाकलून दिलं आहे.

पण माझ्यासाठीं नाहीं मागत. पन्नास मुलं आहेत—आईबापांवेगळीं, पोरकीं. थोडा दानधर्म करा. मुलांची माया आई झालेल्या माउलींनाच कळेल. द्याल कांहीं?"

वरखर्चासाठीं मला शंभर रुपये कालच दिले होते. मी फट्दिशीं पन्नास त्यांना दिले काढून त्यांतले.

ते गेले; पण जखमी मनाची एक खपली काढून गेले. मी मागील दारीं होतें. मागलं दार, बायका, पुण्याईची बाजू!...पुढल्या दारांतून पापाचा पैसा आंत येत होता. अन् मागल्या दारीं बायको कुठं भिकाऱ्यांना अन्न दे, संस्थेला पैसे दे, तुळशीला पाणी घाल असल्या किरकोळ पुण्यकृत्यानं तें प्रचंड पाप धुऊन काढूं पाहात होती. पुढलं दार, मागलं दार! पति अन् पत्नी! पाप नि पुण्य! डोक्यांत गोंधळ माजला नुसता. मन अगदीं बेचैन झालं माझं. कितीतरी उदाहरणं डोळ्यांपुढें आलीं. आमच्या क्लबांत पब्लिक वर्क्स खात्याचे प्रमुख श्री. लांडगे यांच्या पत्नी यायच्या. पतीला पगार पाहावा तर दीडशें. पण कानांत हिऱ्यांच्या कुड्या हजारा दीडहजारांच्या नि लुगडीं शंभरदीडशेंची जोडी! फौजदारांच्या पत्नीच्या गळ्यांत हिऱ्यांचा नेकलेस होता! मामलेदारांच्या पत्नीच्या हातांतलं रिस्टवॉचच नुसतं सहाशें रुपयांचं होतं! दारूचे मक्तेदार दिनशा दारूवाला यांच्या पत्नी मीठा दारूवाला यांच्या रोषणाईकडे पाहतांच डोळेच दिपले असते. यांपैकीं प्रत्येकजणाचा पैसे खाण्याचा लौकिक होता अन् आश्चर्य असं, कीं त्यांत या कुणालाहि कमीपणा नव्हता वाटत. जी ती आपापल्या पतीची बहादुरी वर्णन करायची उलट, मला मात्र वाटे, पतीचं अन्याय्य जीवन स्तुत्य मानायचं हेंच मोठा गुन्हा केल्यासारखं पाप आहे. पतीच्या मोठेपणाचा पत्नीनं अभिमान धरावा, नाहीं कोण म्हणतं? परंतु तो मोठेपणा खोटेपणा, अन्याय, लांचखाऊपणा, जुलूम यांच्या साह्या-नंच पुष्ट होत असला तरीहि पत्नीनं त्याचे गोडवेच का गायचे? छे, नाहीं पटत बाई. अन् म्हणे पत्नीचं कर्तव्य 'पतिदेवाला दुखवूं नका!' पति सज्जन, चारित्र्यवान् असला म्हणजे हें पत्नीचं कर्तव्य ठीक आहे कीं. पण जिथं अनिलसारखे सुशिक्षित पतीदखील अन्यायानं लांच घेऊन, जनतेच्या हक्काचं

अन्नधान्य काळ्या बाजारानं हिसकावून वैभवाच्या बागा उभारतात, तिथंहि पतीला न दुखवतां पत्नीनं सेवाधर्म पाळायचा हें कसलं कर्तव्य ? या काळाची पत्नीधर्माची व्याख्या अगदींच बदलली आहे. पति चुकत असेल तर त्याला सन्मार्ग दाखवून द्यायचा हेंच काम पत्नीचं आहे. नुसती दासी नाहीं; खरी मित्र आहे या नव्या जमान्यांतली पत्नी. वाटेल तें होवो. मी अनिलांना विरोध करणारच. मग त्यासाठीं असलं पापानं पोसलं जाणारं ऐश्वर्य लाथाडावं लागलं तरी चालेल.

आणि खरोखरच माझे अनिलांशीं खटके उडूं लागले सारखे. मी विचारीं, " तुम्हांला रेशनअधिकारी नेमलं तें लोकांसाठीं ना ? लोकराज्य म्हणतां ना तुम्हीच ? लोकांच्या गळ्यांत घाणकचरा बांधून, लांचलुचपतीनं नफा खातां ? अनिल, असं जर सरकारी अधिकारीच करायला लागले, कुंपणच शेत खायला लागलं, तर जनतेचे हाल होणारच कीं ! हा समाजाचा द्रोहच नाहीं का होत ? "

अनिल संतापानं अगदीं फुलून जात आणि ओरडून म्हणत,

" जास्त बोलण्याचं काम नाहीं ! घरांत आयते इतके जिन्नस येतात. तुमचं काम घरव्यवस्था बघायचं. दुसऱ्या माणसांना धड तांदूळ मिळत नाहींत कीं रॉकेल नाहीं दिसत. मी ह्या अधिकारावर आलों–नशीब समजा ! उपाशी मेलां असतांत ! अन् म्हणे लोकराज्य अन् यंव त्यंव ! वाहत्या गंगेंत हात धुऊन घेत नाहींत तेच या काळांत महामूर्ख ठरतात, समजलं ? "

आणि एक दिवस घेलाभाई कापड–दुकानदाराच्या मुलीचं लग्न होतं. तो आला...त्यानं नोटांचं पुडकं अनिलच्या हातांत दिलेलं मीं पाहिलं. रॉकेलचे डबे, साखऱ्याचीं नि उत्तम तांदुळांचीं पोतीं तिकडे रवाना करण्याबद्दलचं अनिलचं अभिवचन मीं ऐकलं. मला खरोखरच अनिलची शिसारी आली अगदीं. एखाद्या दरोडेखोराच्या बायकोला वाटावं तसं मला कसं तरी वाटूं लागलं; अन् जेव्हां हंसतहंसत उंची मलमलचा तागा–घेलाभाईनं दिलेला–त्यांनीं माझ्यापुढं धरला न् म्हटलं, ' बघ ! बघ ! किती नाजूक मलमल आहे. छान दिसेल तुला. ' तेव्हां एकदम मीं

तीव्रपणानं म्हटलं, " ती मलमलहि नको नि तुमच्या असल्या पैशांचं मला कांहीं एक नको ! कशाला गांधीजींचा फोटो इथं लावला आहे ? या सत्याच्या मूर्तीसमोर तुम्ही असत्यानं पैसे खातां ! अनिल, अनिल, जनतेच्या कल्याणासाठीं देह वेंचणाऱ्या या विभूतीचा तुम्ही या लांचखाऊपणानं अपमान करतांहां—

" आपल्याच जातभाईंच्या पोटावर पाय आणणारे तुम्ही खरोखर देशद्रोही, गुन्हेगार आहांत ! शरम वाटते मला तुमची पत्नी झाल्याची ! नको हा पापाचा पैसा ! आपण पूर्वीसारखं गरिबींतच—"

पुढचे शब्द माझ्या तोंडून उमटले नाहींत. अनिलांनीं चिडून टेबला-वरचा जड पेपरवेट फेकून मला मारला. तो माझ्या कपाळांत बसून तिरीमिरी आली मला अगदीं ! दुसरं फ्लॉवरपॉट फेकलं त्यांनीं आणि माझी शुद्धबुद्ध हरपली !...

* * *

मीं डोळे उघडले. कानशिलं अजून झणझणत होतीं. पुष्कळ पट्ट्या कपाळाला बांधलेल्या होत्या. डोकं विलक्षण दुखत होतं...तापही आला असावा...मी डोळे उघडून पाहतें तों अनिल जवळच बसले होते आणि समोरच्या गांधींच्या फोटोला मोठा तडा गेला होता ! अनिल मृदु स्वरांत म्हणाले, " अलका, मला क्षमा कर ! फार जोरांत मारलं मीं...मोठी जखम झाली आहे तुला ! "

मीं मान फिरवून म्हटलं, " आतां माझाहि त्रास फार दिवस तुम्हांला होणार नाहीं, अनिल ! क्षमा कसली त्यांत ? चालायचंच हें. "

" म्हणजे ? " घाबरट स्वरांत त्यांनीं विचारलं.

" अनिल, आपलं दोघांचं पटणं मला यापुढं शक्य दिसत नाहीं. मला बरं वाटलं कीं लगेच मी जाईन इथून कायमची कुठं तरी. तुम्ही तुमच्याच विचाराची एखादी सुखलोलुप पत्नी करून सुखी व्हा. मला हें अन्न खाववत नाहीं—कुठंहि श्रम केले, तर वीतभर पोटाला लागणारे पैसे भल्या मार्गानं मिळूं शकतात. मीं...पुष्कळ प्रयत्न केले...खूप बोललें तुम्हांला; पण कांहीं नाहीं उपयोग झाला...चारित्र्यहीन माणसाची पत्नी म्हणून

जगण्यापेक्षां टाकलेल्या बायकोचं एकाकी जिणंदेखील फार बरं !...फार त्रास दिला...आतां नाहीं बोलणार...क्षमा करा. मींच तुमच्या आयुष्यांतून दूर जाणं बरं ! तुमच्या मनावर थोडीच सत्ता आहे ?" अतिश्रमानं ग्लानि आली होती मला. मीं डोळे मिटले. मला नकळत त्यांतून आसवं झिरपूं लागलीं. एकदम अगदीं प्रेमाचे कोमल शब्द मीं ऐकले—

"नाहीं ! नाहीं अलका ! तूं मला सोडून गेलीस कीं कुणासाठीं मी जगूं बरं ? कुठं नाहीं जाऊं देणार माझ्या फुलाला मी ! आणि...अलका, ऐक तरी ! आतांपर्यंत माझं मन दगडासारखं झालं होतं...प्रीतीनं शेवटीं तूं मला जिंकलंस ! मी शपथ घेतों, एक पै खाणार नाहीं मी आजपासून. मी नेकीनं, प्रामाणिकपणानं राहीन......फक्त माझी ही सोनसांखळी माझ्याजवळच राहिली पाहिजे ! अगदीं या दरिद्रीनारायणाची शपथ ! दारिद्र्यांतदेखील मी राहायला तयार आहें...पण चारित्र्याची दौलत नाहीं गमावणार !...आतां झालं ?"

मीं डोळे उघडले, काळ्यानिळ्या ढगांत गुरफटलेला चंद्र पुन्हा सौख्यसुंदर तेजानं उजळावा तसा अनिलांचा सुंदर चेहरा पवित्रपणाच्या दीप्तीनं तेजाळ दिसत होता.

त्यांच्याच हातानं मला जखम झाली होती हें विसरून गेलें मी आणि आसवं टिपतांटिपतां हंसूं लागलें समाधानानं ! पाप पराजित झालं होतं. म्हणूनच कीं काय, तडा गेलेल्या कांचेंतून महात्माजींची प्रसन्न नजर पुण्याईचाच वर्षाव करीत होती आमच्यावर !

—✱—

# पणतीची ज्योत !

नंदापुरला आमची बदली झाली हें कळल्याबरोबर मला एकदम मीरा रेगेची आठवण झाली. मीरा तेथेंच रहात होती. ती माझी बालमैत्रीण ! किती बुद्धिमान्, तरतरीत, व्यवहारकुशल अन् प्रकृतीनं सुंदर होती ती ! दिसायला काळीसांवळीशी पण टापटीप, नीटनेटकेपणा अन् आकर्षक वेषभूषेनं उठून दिसणारी तिची मूर्ति मला आठवली.

किती आनंद झाला मनाला ! माझ्या अन् तिच्या विचारांत जमीन-अस्मानाचा लहानपणीं फरक असे. माझं माहेर सनातनी, त्यामुळं आई-प्रमाणेंच 'बायका किती शिकल्या तरी काय, चूल न् मूल हेंच त्यांच्या आयुष्याचं सार !' असेच उद्‌गार मी काढीं; मग मीरा आपले मोठे डोळे अधिकच विस्तृत करीत आवेशानं म्हणे,

"मला नाहीं वाटत ! अगदीं बुद्धिमान् स्त्री याहूनही कांहीं जास्त करूं शकते, हें मी दाखवीन जगाला एक दिवस. ज्याला प्रगतीची इच्छा आहे त्याला प्रतिकूल परिस्थितींतूनही मार्ग काढतां येतो !"

ते बाणेदार उद्गारही जणूं पुन्हां एकवार कानाशीं घुमले. मी हंसलें... खरंच तिचं लग्न...नव्हे प्रेमविवाह झालेला, मीं ऐकला होता. प्रथम तिचीं पत्रंहि आलीं, पण मी आमच्या सांसारिक व्यापांत गुरफटून तिला उत्तरें लिहिलीं नव्हतीं. अर्थात् एकांगी पत्रव्यवहार चालणार किती दिवस ? पण एकंदरींत लग्न झाल्यानंतर सहाएक वर्षांनीं मी तिला, तिच्या दोन तान्हुल्यांना अन् तिच्या पतीला प्रथमच पहाणार होतें ! जणुं एकादें रम्य चित्रांचें पुस्तकच हरवलें होतें स्मृतिकपाटांतून, तें मला मिळणार होतें.

बाळपणींचीं सारीं चित्रें, जीवनग्रंथाचीं पानें उलटून आम्ही पुन्हां पाहूं शकणार होतों! किती तरी आनंद होत होता चित्ताला.

नंदापुरला आल्यावर दुसरे दिवशीं तिच्या बिऱ्हाडाचा पत्ता काढून मी तिला दुपारीं भेटायला गेलें. घर मोठें दिसत होतें. ४–५ लहान मुलें बाहेर खेळत होतीं. त्यांतली छोकरी ओळखली मीं एकदम आमच्या मिराचीच कन्या म्हणून! कारण मिराचाच चेहरा होता तो! फोटोच्या कांचेवर जसें छोटें प्रतिबिंब दिसावें, तशी काळाच्या पडद्यावर उठलेली ती मिराचीच छोटी छबी होती. मीरा जणुं पुन्हां छोटी बेबी होऊन त्या मुलीच्या चेहऱ्यांतून माझ्याकडे पाहात होती डोकावून. पाहतां पाहतां मुलांची भांडाभांडी सुरू झाली. मिरासारख्या दिसणाऱ्या मुलीला दुसऱ्या मुलांनीं मारलं अन् ती मोठ्यानं रडूं लागली. तेव्हां आंतून एक उग्र चेहऱ्याची बाई आली. तिचं माझ्याकडे लक्ष गेलं नाहीं. भांडण ऐकून घेऊन ती म्हणाली,

"यांच्या नोकऱ्या होतात! अन् आमचं मरण आहे दररोज! दोन पोरं घरीं टाकायचीं, जायचं बाहेर निघून! आम्ही आहोंतच मोलकरणी गिळायला घालायला अन् धुणीं धुवायला! काय ग कुंदा, आई बोलतें म्हणून तूंही बोलतेस काय सगळ्यांना? अं! देऊं का एक?"

मग कुंदाच्या गालावर, त्या नाजूक गोंडस गालावर, एक पांच बोटांची चपराक उमटली...अन् दंगा शांत झाला—

मला तें बरं वाटलं नाहीं...तथापि मुद्रेवर निर्विकारपणा दाखवून मीं म्हटलं, "मीराताई कोठें आहेत? घरीं आहेत का?"

ती बाई कपाळाला छप्पन आंठ्या घालून म्हणते,

"अहो, कामाचीं माणसं तीं! त्या कुठं यावेळीं घरीं?- दिवाळीची सुटी आहे...तरी मीटिंग का काय तरी आहे म्हणे!"

"मी थोडा वेळ थांबलें तर भेट होईल का?"

"बसा हव्या तर! ती त्यांची खोली; आतां तीन वाजले कीं आयता चहाफराळ करायला येतील तुमच्या मीराबाई, तो घेऊनच चला. तुम्ही कोण त्यांची मैत्रीण वाटतं?"

त्या बाईच्या कपाळावरच्या आंठ्याकडे पाहात मीं म्हटलं,

" मैत्रीणच तर काय ? सहा वर्षांनीं बदली झाली इथें, म्हणून भेट तरी होते का पहावं म्हटलं. पण घरीं नाहींच भेटली. आपण कोण, त्यांच्या थोरल्या जाऊबाई वाटतं ? "

" हो थोरली. पण बरं का, नुसती नांवाची थोरली आहे. तुमच्या मैत्रिणीनं सारखीं बाहेर कामं करावीं अन् मीं मुलांचे कष्ट उपसावे, सैपाक-पाणी करावं, घर सांभाळावं. अस्सं चाललंय तीन वर्षे...बरं, बसा तुम्ही येथें. चहाची वेळ झाली आहे. बाईसाहेब आत्तां हपिसरसारख्या येतील चहाला...मला मेलीला कांहीं मान आहे का बघा ! "

मग त्या खरोखरच उठून गेल्या. आंतून धाडधाड कपबशा आपट-ल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. कुन्दा डोळे कुसकरीत आंत आली अन् मला पाहून दचकून परत जाऊं लागली. तेव्हां प्रेमानं मीं म्हटलं,

" ये ना बाळ ! अग, मी मावशीच आहें बरं का तुझी. जरा बोल तर खरी आमच्याशीं, नांव काय तुझं ? तुझा भाऊ कुठं आहे ? "

छोट्या कुंदाचें मुखकमल लगेच प्रसन्न दिसूं लागलें. ती गुळुगुळू बोलूं लागली,

" हो ? तुम्ही मावशी माझ्या ? खरेंच ? मग...मी येऊं का तुमच्या घरीं रहायला ? कनी काकू...( आजूबाजूला पहात हळूच ) मला रोज मारते. गालाचे गालगुचे घेते...ओरडते...शिव्या देते आम्हांला—"

" अन् आईबाबांना नाहीं वाटतं तूं हें सांगत ? "

एवढीशी कुंदा गंभीर झाली. ती म्हणाली, " आई कनी शाळेंत खूप दमते बरं...घरीं आल्यावर मीं हें सांगितलं तर तिच्या डोळ्यांतून पाणी येतं...म्हणून नाहीं मी सांगत. बाबांना यायला तर दिवे लागतात. "

कोपऱ्यांतला पाळणा हलूं लागला अन् पाळण्यांतून एक लहानसा सूर निघाला. कुंदाचे ओंठ हंसूं लागले. लगबग ती तिकडे गेली.

" आलेच्या ! तूं उथला का ले ? येले, माज्या लाजा ! "

अन् एक गोजिरवाणा बाळ तिनं हळूंच उचलून घेतला. बाळ पुष्कळ निराळा, खूपच देखणा होता. कुंदानें हाल केले म्हणून तो रडूं लागला. तेव्हां आंतून शब्द आले,

"उठलं का कारटं इतक्यांत ? जरा मेली जिवाला विश्रांति कशी मिळत नाहीं. बाहेर न्याय निवडतात न् घरीं माती चिवडतात, तसाऽऽ प्रकार हो ! बाहेर खंडीभर मान आहे, करायचा काय घेऊन ?"

थोडंसं दूध बाटलींतून आणीत ती मघांची उग्र बाई परत आली... अन् खसकन् बाळाला तिनं खालीं ठेवला. बाळ अधिकच रडूं लागला. दूध घेईना. तेव्हां कळवळून मीं म्हटलं,

"मी घेतें मांडीवर त्याला; अन् बाटली द्या इकडेच..."

जरा शांत केल्याबरोबर बाळ दूध पिऊं लागला. त्याचं दूध पिणं होतांच तो झोपीं गेला...मीं त्याला पाळण्यांत ठेवलं.

तोंच बाहेरून शब्द आले,

"रेशनच्या बाजाराला जायचं आहे. पैसे द्या पाहूं."

कांहीं पुरुष वरिष्ठापुढें गरीब गाय पण पत्नीपुढें कर्दनकाळ असे दुहेरी वागणारे असतात, तशाच कांहीं कजाग स्त्रियाही पतीपुढें दीन मेंढी पण मुलांबाळांवर, लहान माणसांवर रागावतांना जणुं चिडलेली वाघीण अशा दुहेरी स्वरूपांत आढळल्या कीं मोठा विस्मय वाटूं लागतो. कारण मघांच्या ज्या तोफखान्यांतून तोफांचे गोळे उडत होते त्यांतूनच जणूं प्राजक्तांच्या फुलांप्रमाणें कोमल शब्द निघाले—

"पैसे आतां कुठून बरं देणार ? बाईचा आज पगाराचा दिवस आहे. एवढ्यांत येतील त्या...खरेच. त्या इतक्या धडपडतात म्हणून कांहीं आहे...नाहींतर..."

"पुरे जाऊबाईचं कौतुक ! लोकांनीं मुलं सांभाळावीं, दुसऱ्यांनीं अन्नाचे घांस उकडून घालावे तेव्हां यांच्या नोकऱ्या ! अरे पण मी म्हणतों, तुम्हांला जर नोकरी करायची होती तर मुलं कशाला होऊं दिलीं तुम्हीं ! मला तर फार चीड येते. बायको म्हटली म्हणजे तिचं खरं काम घर

संभाळणं, अन् प्रभ्याला हें समजत नाहीं. जाऊं देतो दिवसभर बायकोला हपिसांत ! ठीक आहे ! अहो...तुम्हीही जा नोकरीवर. जा देहू रोडला ! मी करीन स्वयंपाक अन् पोरांचं ! बायका बाहेरचीं कामं करतात, मग पुरुषांनीं घरं नको संभाळायला ? छ्यऽ ! छ्या ! बरं चहा आणा बुवा ! "

कांहीं माणसांचं हंसणंदेखील असं असतं कीं अंगावर शहारे येतात ऐकून. मिरेच्या भोंवतींची सारी परिस्थिति मला समजून चुकली होती... तिचे पति कसे असतील बरं ?...असेच का ?

माझ्या मनांत तरंग उठला अन् समोरच्या टेबलावर कुंदानं पालथा पाडलेला एक फोटो नजरेंत भरला. तो सरळ करतांच एका रुबाबदार देखण्या युवकानं फोटोंतून माझ्याकडे हंसून पाहिलं...जणुं अद्भुत शक्तीनें बाळ एकदम पंचवीसतीस वर्षांचा झाला तर असाच दिसेल असं मनांत येऊन मी हंसलें. मला समजलं. बाळचा पिताच होता तो...

" अय्या ! तूं ? सोनू ? कधीं आलीस ? केव्हां आलीस ? अग, बरी आहेस ना तूं ? राहणार ना आतां ? "

मीरा दारांतून प्रश्नांचा भडिमार करीत आंत आली. लहानपणचे हे शंभर प्रश्न एकदम करायचे हें स्वभावाचें तंत्र अजून तसेंच आहे म्हणायचें बाईसाहेबांचें ! अन् काय आश्चर्य, थेट बाळपणींसारखीच ती एकदम जवळ आली, गळ्यांत दोन्ही हात अडकवून तिनं प्रेमानं पाहिलं अन् रुसक्या आवाजांत म्हटलं,

" तुला कांहीं वाटतच नाहीं माझ्याबद्दल ! पत्रसुद्धां लिहूं नये होय ? "

मी हंसलें. तीही हंसली. शुद्ध सात्त्विक प्रीतीचा हा क्षण आम्हा दोघींना कितीतरी सुखमय भासला...पुढल्या क्षणीं मीं म्हटलं,

" मीरा ! कित्ती वाळली आहेस तूं ! तेव्हां कस त्यांच्यासारखे लाल वाटोळे गुबगुबीत गाल होते तुझे...! सगळे टमाटे पतिराजांनीं रोज..."

" हां हां, चावटपणा करूं नकोस ! मोठी झाली आहेस आतां ! "

ती दटावून म्हणाली, अन् तान्हुल्याला तिनं झप्‌कन् उचलून घेतलं. अन् प्रेमानं म्हटलं,

" ए, सोने! इकडे बघ, हा तुझा लाडका भाचा. किती सुंदर दिसतो नाहीं ? अन् माझी कुंदकळी पाहिलीस ना ? कुंदा ! इकडे ये, मावशीला नमस्कार कर. अच्छा, कुंदा, टेबलावर शाई कुणीं ग सांडली ? अग, असं करूं नये. मी बाहेर असलें कीं तूं मोठी शाहणी बाई होतेस. नाहीं का ? "

ती बोलत होती. मग झपाझप खोली आंवरीत ती म्हणाली,

" तूं म्हणशील, किती अव्यवस्थित वागते मीरा म्हणून ! नाहीं ? "

तिच्या जाऊबाई चहाचा ट्रे घेऊन आल्या. एकाद्या मांजराप्रमाणें त्या गरीब अन् शांत दिसत होत्या यावेळीं...पण मांजर वाघाची मावशीही असूं शकतें हें मीं पाहिलें होतें नुकतेंच ! मिरानं सस्नेह म्हटलं,

" या माझ्या थोरल्या जाऊबाई, या सारं घरचं पहातात हो. मला आई नाहीं, ती उणीव यांनीं भरून काढली आहे. अग, यांनीं घर, मुलं संभाळलीं नसतीं तर मला कांहीं नोकरीला जातां आलं नसतं बरं ! पगार आला आहे. हे घ्या त्यांतले ऐंशीं रुपये बाई—"

ऐंशी रुपये घेत तोंडभर हंसून त्या म्हणाल्या, " एवढेच का ? बाकी, पण बाळ न् कुंदासाठीं एक मोलकरीण पहा या महिन्याला, मीराबाई ! मी एकटी तरी काय काय पाहूं ? दुखणं येईल मला ! "

मीं वळून पाहिलं, तों मीरा उदास झाली होती. संध्याकाळ होतांच कोणतेंसें एक फूल मिटतें, त्याच्या पाकळ्या मिटूं लागतात म्हणे. तशा तिच्या उल्हासाच्या पाकळ्या जणुं एकेक मिटत चालल्या होत्या...

त्या निघून गेल्यावर मीं म्हटलं,

" मीरा, लहानपणची बाणेदार मुलगी ती तूंच का ? "

" हं, मीच ती दुर्दैवी मीरा ! " ती म्हणाली अन् तिचे डोळे भरून आले.

" हें काय मीरा ? मला नाहीं सांगायचं ? काय झालं आहे ? मी समजत होतें, मीरा किती सुदैवी असेल ! नोकरी, घरकाम, मुलांची जोपासना, सारं कसं करतेस बाई ? "

ती उद्गारली,

" सारं करायला पाहातें, म्हणूनच मला कांहीं यश येत नाहीं कीं काय कुणाला ठाऊक ! सोनू ! सायकल वाजली ! प्रभाकर आले वाटतं. त्यांच्यासमोर नाहीं कांहीं मी बोलूं शकणार ! पण कळवीन तुला सगळं. लिहूनच ठेवतें सगळं मनोगत ! हो, तुझ्याजवळ मन हलकं करायचं नाहीं तर कुणाजवळ ? "

पति येतांच मीराची उदासवृत्ति लोपून गेली. एकाद्या आनंदी पक्ष्यांच्या जोडीप्रमाणें तीं दोघे आनंदानं किलबिलूं लागलीं. मध्येंच प्रभाकरनां मीं म्हटलं,

" अभिनंदन ! पत्नी मिळवती तर आहेच. पण उत्कृष्ट शिक्षिका पण झाली आहे. ऐट झाली आहे आपली—"

ते हंसले. पण लगेच गंभीर होऊन म्हणाले,

" पण माझे हाल त्यामुळें अधिकच वाढणार आहेत अशी साधार भीति वाटते...जोडीदार फार मोठेपणा मिळवूं लागला कीं त्याच्या सहचराला तो मोठेपणाच जाचतो असं दिसतं बुवा. बरं मीरा, आज संध्याकाळीं तरी फिरायला येशील का ? "

ती साशंकपणें आंत पाहूं लागली. आंतून शब्द आले,

" आतां कुंदे, तुझी आई करील संध्याकाळचा सैंपाक. तिला सांग, थालिपीट हवं आहे तें...मी किनी कथेला जाणार आहें. बरं का ? रात्र होईल मला..."

प्रभाकराच्या रागावलेल्या चर्येकडे पहात मीरा आर्जवानें म्हणाली, " कीं नाहीं, रागावूं नये...पण आजही जुळायचं नाहीं. सैंपाक आहे. शिवाय बाळ–कुंदा कंटाळतात, त्यांना जरा घ्यायला नको का बरं ? "

" बरं, मग रात्रीं तरी जाऊंया सिनेमाला ? जीवनयात्रा—नवा बोलपट लागला आहे...येशील का ? "

सचिंत होऊन मीरा म्हणाली, "रात्रीं ? नको गडे आज ! उद्यांला हीं कामं पुरीं करून पाठवावयाची शेवटची तारीख आहे...रात्रीं लिहिणार आहें बरंच मी—"

"मग त्या कामाएवढीही माझी किंमत नाहीं म्हणायची ?"

प्रभाकराच्या नजरेंतून रागाचे स्फुलिंग बाहेर पडूं लागले तेव्हां ती म्हणाली, "बरं तर ! मी येईन ! बाळाला मात्र घेऊन जाऊं अं ? बाई फार रागावतात नाहीं तर..."

"तर मग बाळ, कुंदा, बाटली, पाणी, दुपटीं सगळं घेऊन जायचं म्हणेनास ? नकोच नाहींतर...त्यांत गंमत नाहीं..."

"बरं, जसं तुम्ही म्हणाल तसं—" ती उद्गारली.

रुष्ट चर्येनें प्रभाकर म्हणाले, "पाहिलंत ? हें असं आहे. अशिक्षित साध्या गृहिणींना कर्तृत्वशाली होण्याच्या भलत्याच महत्त्वाकांक्षा नव्हत्या ! साधं मुलांचं न् पतीचं सुख पाह्यचं, एवढीच त्यांची अल्पसंतुष्ट वृत्ति असे. ते नवरे फार सुखी होते, नाहीं ?"

अन् मग ते रुष्टपणें पाहात निघून गेले. जातांना मागें वळून ते म्हणाले, "जेवायला वाट पाहूं नका. जीवनयात्रा पाहून येईन–रात्रीं दहाला ! हो, दमल्यावर कांहीं करमणूक तरी नको का ?"

मीरानं माझ्याकडे पाहिलं. पूर्वीं बाई बोलल्या कीं शाळेंत मिराचा चेहरा गोरामोरा होई, तसा आतां दिसूं लागला. ती उद्विग्नपणें म्हणाली,

"बाळपण किती छान असतं नाहीं ? पुन्हां मूल होतां येत असतं तर फार छान झालं असतं ! मनोवेदनांपासून बालकं कशीं दूर असतात. फार सुखी दैवाचीं असतात बाई तीं—"

झाल्या गोष्टींचा विचार करीत मी परत आलें.

आम्हीं एका जॉली ट्रिपचा बेत केला होता, म्हणून मिराला मीं बोलावलं होतं. वाटलं, एकादा दिवस मजेंत काढूं. नाहींतर या घरच्या प्रपंचाच्या रगाड्यांतून वेळ कुठला असा मजेंत घालवायला मिळणार आहे ? परंतु ती आली नाहीं...गड्याहातीं तिचं एक पत्र आलेलं पाहून मीं चकित

होऊन झप्‌दिशीं पाकीट खुलं केलं,...अन् मीरा जणूं पुढं उभी राहून बोलूं लागली एकदम माझ्याशीं ! हो, तेच निराश शब्द—तेच गंभीर विचार :

" प्रिय सोनूताई ! रागावूं नकोस बरं या मीरावर ! मला येतां येत नाहीं गडे ट्रिपला ! घरांत पाहुणे आले आहेत, अन् जाऊबाई खूप चिडून आदळआपट करीत आहेत, काम फार पडतं म्हणून !—तेव्हां सुट्टीच्या दिवसांत मीं जाणं घरीं कुणालाच रुचायचं नाहीं !—

" अन् सोने, किनाई, तूं नकोच असे बेत करत जाऊंस !—असे म्हणजे, मला कुठें बोलावण्याचे ! मी तेवढी स्वतंत्र नाहीं ! सोनू, खरं म्हणजे मला पुष्कळदां वाटतं ही नोकरी सोडून बसावं घरीं. फार हाल होतात बघ माझे ! घरीं जाऊबाई माझ्या दोन्ही लेंकरांना हिडिसफिडिस करतात, उणींदुणीं बोलतात, यांच्याही वृत्तींत बदल पडूं लागला आहे. तेही कपाळाला आंठ्या घालून, रागावून बोलतात...पण सारं मी दुर्लक्षीत करतें. अग, सुखासुखी सव्वाशें रुपये कोण देणार आहे ह्या महागाईच्या काळांत ? भाऊजी कुठेंसे कारकून आहेत तीस रुपयांवर ! प्रभाकरांना सव्वाशें रुपये मिळतात, अन् मलाही तेवढेच मिळतात; म्हणून आमचा संसार धड चालला आहे... नाहींतर घरभाडं चाळीस...अन् दूध पन्नास ! कसं जगायचं कुणास ठाऊक ! मला वाटलं मी सुशिक्षित आहें, चार पैसे मिळवूं शकण्याची माझी पात्रताही आहे, करावी मदत कुटुंबाला ! म्हणून नोकरी धरली. सोनू, मला लहानपणीं अभिमान वाटायचा कीं, कर्तृत्व दाखवायला स्त्रीला जो मनाचा खंबीरपणा अन् कष्ट करण्याची पात्रता असावी लागते ती माझ्या ठायीं आहे म्हणून ! पण खरं सांगूं ? स्त्रीनें कर्तृत्व गाजवलं, तरी तिला मान घरांत नाहींच कां ग ? आतांच बघ, पैशांचे एवढे हाल होते-ते मीं नोकरी केल्यापासून किती कमी झाले ! तरी सगळीं जळफळतात माझ्यावर आपलीं ! हं, काय ? भाऊजी फक्त तीस रुपये आणतात ! तरी घरीं आल्यावर त्यांची केवढी मिजास ? त्यांना विश्रांति हवी ! करमणूक हवी ! शांतता पाहिजे ! अन् प्रभाकर नोकरीवरून येतात तर ते सरळ क्लबला जाऊं शकतात, फिरायला जातात, मित्राकडे किंवा सिनेमाला जातात, अन् मनरंजन करून घेऊं शकतात...पण मी एक स्त्री आहें

ना ? मला कांहीं विश्रांति नाहीं...सकाळीं पडेल तें काम करायचं, घाईनं नोकरीवर जायचं, संध्याकाळीं आल्यावर संध्याकाळचा सैंपाक नको करायला ? जाऊबाई सारा दिवस दमून (!) पुराणाला जातात. रात्रीं ' होमवर्क ' तपासायला आणतें...अन् बाळ, कुंदा यांची व्यवस्था. अन् रागावलेल्या प्रभाकरांची समजूत काढतें थोडी. पण सोने, मला पुष्कळदां वाटतं...मी हे असे अविश्रांत श्रम कोठवर सोसूं शकेन ? लहानपणीं आपण एक कविता म्हणत होतों, आठवतं ?—

' इवलिशी दिवलीची ज्योत । कशी साहील वाऱ्याचा झोत ? '

" आज तिची मला आठवण होते. स्त्री कर्तबगार असली तरी पणतीच्या ज्योतीला चहूंकडून वारा लागतो, ती थरथरत असते; त्याप्रमाणें स्त्रीची कर्तबगारी चहूकडून उपेक्षित मानून टीकाटवाळीच्या वादळांत एकटी उघडी पडली आहेसें वाटतं मला ! घरच्यांची सहानुभूति नाहीं ! मुलांचे हाल ! पति नाखूष; घरचं प्रत्येक माणूस नाराज...अन् या सर्वांच्या बदल्यांत उभे दिवसाचे बाराचौदा तास अविश्रांत श्रम—मला सांग, सोने, पुरुषांना असा त्रास होतो ग ? कंदिलावर कांच असते तसं त्यांच्या कर्तृत्वाच्या प्रकाशाला सन्मानाचं, अभिमानाचं, साऱ्यांच्या सहानुभूतीच संरक्षण असतं. कंदिलाची ज्योत पणतीप्रमाणं कधीं थरथरत नाहीं, विझून जाऊं पाहात नाहीं ! कांचेमध्यें कशी शांत, उज्ज्वलतेनं प्रकाशत असते ती ! मला सांग, सोनू, प्रभाकर दमून येतात. मी नाहीं का दमून येत ? मला नसेल का विश्रांतीची, रंजनाची जरूरी वाटत ? पण जाऊबाई पुराणाला जातात, दोन तास झोंपूं शकतात ! अन् मी ? उभ्या दिवसांत पांच मिनिटंही मला विश्रांतीचीं नसावींत का ? पण सोने, खरं सांगूं ? सुशिक्षित, मिळवत्या पत्नीवर आतांच्या काळीं घरची, बाहेरची दुहेरी जबाबदारी पडते, अन् फिरून त्याबद्दल एक गोड शब्द नाहीं कीं कृतज्ञताही नाहीं. प्रभाकरनां म्हटलं, दुसरं बिऱ्हाड करूं ! पण जागा नाहीं; अन् मुलांना सोडूं कुणाजवळ ? बरं, नोकरी सोडतें म्हटलं तर म्हणतात, घर चालायचं कसं ? काय करूं ? कांहीं समजत नाहीं... तुझी मीरा, या प्रतिकूलतेच्या वादळांत, तिच्या जीवनज्योतीचे तेज

संपुष्टांत येऊं लागलें आहे...अशीच एक दिवस ही पणतीची मिणमिणीत ज्योत विझून जाणार, सोनू ! विशेषतः प्रभाकर नाखूष असतात म्हणून मला हें जगणंही नको वाटतं. आम्हीं एकमेकांना उत्साह द्यायचा, श्रम-परिहार करायचा अन् दोघं मिळून जीवनाशीं झुंज द्यायची, या मनोहर कल्पना आतांशीं पुसटून चालल्या आहेत...प्रभाकरांना दोष नाहीं... प्रेमळ गृहिणी असती तर ती त्यांना सुखकर वाटली असती. असल्या दहा माणसांच्या घरांत ' कामसू ' बाई योग्य ठरली असती ! पण लग्न करतांना ही चूक त्यांच्या हातून घडली. असो. त्यांचं आयुष्यही मी सुखी करूं शकत नाहीं...पण कदाचित् ही ज्योत विझल्यानंतर ते ही चूक दुरुस्त करूं शकतील !

" सोने, रागावूं नकोस. तूं सुखी आहेस. मुलाबाळांचं करावं, पतीचं सारं करावं, मजेंत असावं ! हें आयुष्य मला का नको होतं ? पण प्रभाकरांची प्राप्ति कुटुंबाला पुरत नाहीं, म्हणून मी धडपडायला पहातें; अन् हेंच माझं चुकतं कीं काय देव जाणे—

" असो, येतां येत नाहीं त्याबद्दल क्षमा करशील ना ?

तुझी—मीरा. "

* * *

या पत्राला मीं उत्तर लिहिलं झट्कन् :

" मीरा ! तूं वेगळं बिऱ्हाड झट्कन् कर आतां ! जाऊबाईंचीं पांचसहा मुलं न् तीं दोघं तीस रुपयांत जगूं देत सहा महिने, म्हणजे कळेल तुझी किंमत त्यांना ! अन् हें पटत नसेल तर तूर्त दोनतीन वर्षे नोकरी सोड ! तान्हं मूल, घरकाम अन् सगळा दिवस बाहेरचे श्रम अन् पतिराजाच्या सहवासोत्सुक मनाचं समाधान, सारं जमत नाहीं एका स्त्रीला ! तेव्हां बाळ लहान आहे तोंवर तूं गृहिणीच हो कांहीं दिवस ! गरिबींत राहावं लागेल. पण एकाच माणसाची ही जी दुर्दशा चारी बाजूंनीं चालू आहे ती तरी नाहीं राहायची मग ! अन् ज्या जाऊ–दीराला तुझी योग्यता समजत नाहीं–सहकार्य देण्याचीही अक्कल नाहीं, त्यांच्यासाठीं तूं कां खर्च

करावास मीरा ? फार चांगुलपणाला या जगांत किंमत नाहीं. व्यवहार रूक्ष असतो...तेव्हां ते राहूं देत गरिबींत ! आमच्या पोस्टाजवळ दोन खोल्यांत तूं बिऱ्हाड थाट. मी कुंदाचं अन् बाळाचं बघत जाईन आहे तोंवर अन् तुम्ही दोघं न् दोन मुलं म्हणजे कामही फार असणार नाहीं. तुमचा संसार तर एवढासा ! सारं काम, पसारा त्या दोघांच्या संसाराचाच आहे. अन् तुम्हां दोघांना अडीचशें रुपयांत नोकर ठेवून थाटांत राहातांही येईल, तुलाही विश्राति मिळेल. प्रभाकरनांही 'सह-जीवनाचा' लाभ मिळेल ! उगीच नाहीं. त्या चांगुलपणासाठीं तूं तुझ्या कर्तबगारीच्या ज्योतीला आपणच खंबीरपणाचे, व्यवहारचातुर्याचें, सोईचें-काचेचें आच्छादन केलं पाहिजे यापुढें ! समजलं ? आज प्रभाकर येणारच आहेत...त्यांना कांहीं पटतं का—"

आंत कुकर भरायची वेळ झाली म्हणून पत्र टेबलावर ठेवून मी पटकन् आंत गेलें. अर्ध्या तासांत बाहेर येऊन पाहातें तों प्रभाकरपंत दोन्ही पत्रें वाचून हतबुद्धपणें उभे होते...पश्चात्तापाच्या छटा त्यांच्या डोळ्यांत दिसत होत्या ! मीं तीव्रपणानं म्हटलं,

"प्रभाकर ! मीरा गरीब आहे खरी स्वभावानं, पण तुम्ही पुरुष किती सुशिक्षित पत्नीकडून फारच अपेक्षा करतां. तिनं गृहजीवनही चोख संभाळावं ! तिनं मुलांची व्यवस्थाही नीट पाहावी ! आदर्श माता तर ती असलीच पाहिजे ! प्रेमळ पत्नीही ती हवीच. पतीच्या मनधरणीनं वागणारी हवी ! अन् शिवाय तिनं नोकरी करून कुटुंबाची आर्थिक बाजूही संभाळली पाहिजे ! तुम्ही तरी स्वतां मुऱ्या कराल का असल्या सगळ्या अपेक्षा तुमच्याबद्दलच्या ? सोडून द्यायला सांगा मिराला नोकरी ! घटकाभर कुणाशीं बोलायलादेखील बापडीला सवड नाहीं ! याचा राग ! त्याचा राग ! पणतीच्या ज्योतीप्रमाणें या रागाच्या भीतीनं बिचारी मनांत थरथरते नेहमीं. पुरे ही कुचंबणा—नाहींतर—"

प्रभाकर एकदम म्हणाले,

" हो, नाहींतर ती मला सोडून जाईल कायमची !...खरंच हीं दोन्हीं पत्रं वाचलीं अन् माझ्या डोक्यांत प्रकाश पडला. खरंच, मी वेगळं बिऱ्हाडच करावं म्हणतों...दादांना पन्नास रुपये उचलून देणंच बरं...उगीच माझ्या मिरेचे असे हाल नकोत. कुठें ती जागा आहे पाहूं ? "

समोर मोठा दिवा प्रकाशत होता. त्याच्या कांचेकडे पहात मी खूष होऊन त्या खोल्या प्रभाकरनां दाखवायला लागलें. पणतीच्या ज्योतीला आतां सन्मानाची, पतिप्रीतीची संरक्षक कांच मिळणार होती, ही माझी खात्री पटली नव्हती का ?

—*—

# न दिसणारे कांटे !

किती सुंदर इमारत दिसत होती ती अगदीं ! तिचा गहिरा, गुलाबी मोहक रंग हिरव्यागार बागेंतून कसा उठून दिसत होता. जणुं बिनकांट्यांचा मोठा गुलाबच हिरव्या पर्णराजींतून डोकावून पाहतो आहे ! पण या इमारतीला एक छोटासा तडा गेलेला जेव्हां मीं पाहिला तेव्हां मला जरा आश्चर्यच वाटलं. माझ्या दादानं बंगला सुंदर बांधून ही लहानशी फट कशी राहूं दिली ? असंही मीं मनाशीं म्हटलं.

आमचे दादा खरंच भाग्यवान् ! नाहींतर आपल्या महाराष्ट्रांत लेखनावर पैसा कमावून बंगला बांधणारे साहित्यिक कितीसे आहेत ? नखांबोटांवर मोजण्याएवढेच ! खरं ना ? पण लोकप्रिय लेखक चंद्रकांत खरंच नशिबाचे. सात सात रुपये कादंबरीची किंमत असली, तरीहि त्यांच्या हजारों प्रती खपाव्या; तिसऱ्या, चौथ्या आवृत्त्याही भरकन् संपून जाव्या; अशा महागाईतदेखील घरोघर त्यांचीं पुस्तकं दिसावीं, एकसारखीं उत्तमोत्तम पुस्तकं प्रकाशित व्हावीं हा कपिलाषष्ठीचा योग !—अगदीं...

" रेशनचा त्रास नाहीं, " " पेट्रोल भरपूर मिळतं आहे; " " तांदूळ पोटभर मिळतात ! " " मुंबईला नोकरीबरोबरच छानदार जागा मिळाली रहायला ! " किंवा " स्वस्ताई झालीय " इत्यादि वाक्यांप्रमाणेच तुम्हांला ही गोष्ट अशक्य कोटींतली वाटणार ! पण चंद्रकांतनं हा लोकप्रियतेचा उच्चांक गांठला होता हं खरंच.

चंद्रकांताच्या नव्या कादंबरीला ' कालिदास प्राइझ ' मिळालेलं मीं वाचलं मात्र. त्याला कधीं भेटेन असं मला झालं ! माझा मामेभाऊ, परंतु पांच पांच वर्षांत आमच्या गांठीभेटी होत नसत. आपल्या माणसाचा गौरव

न् कौतुक करावंसं वाटायचंच कीं ! हैद्राबादेंत स्थिरस्थावर होतांच आम्ही परत तेथें शांतपणें राहूं लागलों होतों. पण त्या धामधुमीनं जीव त्रासून गेला होता अगदीं. इकडची परवानगी घेऊन मी मुद्दाम यावेळीं चंद्रकांताकडे चार दिवस रहायला यायचं ठरवलं. म्हटलं, माहेरपणहि होईल अन् बहराला आलेला संसारहि पाहूं भावाचा !

जाऊबाईच्या हवालीं चार दिवस घर नि मुलाबाळांची जोखीम सोंपवली आणि एक दिवस चंद्रकांताच्या बंगल्यांत मीं अगदीं सकाळींच प्रवेश केला ! वातावरण किती प्रसन्न होतं अगदीं ! बंगल्यासभोंवतींची बागेची रचना कसोशीनं केलेली दिसली. सुंदर चिमुकले वाफे फुलझाडांनीं डंवरले होते. पायऱ्यांवर ओळीनं सुंदर रोपं लावलेल्या कुंड्या होत्या. दारावरून व खिडक्यांना नक्षीदार कापडांचे पडदे होते. हा सर्व झोकनोक पाहून मीं मनाशीं म्हटलं, ' किती दादाच्या राहणींत फरक दिसतो आहे झालेला ! एकंदरींत आमचा दादा सुखी दिसतोय. '

अन् खरोखरच त्या बंगल्यांत टापटीप, व्यवस्था अन् संपत्ति हातांत हात घालून नांदत आहेत असं मला दिसून आलं. कुठेंहि चिमूटभर केर नव्हता. सारं सामान किती व्यवस्थित होतं ! कोणतीही खोली पहा, कोठलंही टेबल घ्या, कोणतेंही शेल्फ अगर कपाट बघा, अत्यत व्यवस्थेंत सामान, पुस्तकं, भांडीं, कपडे यांची ठेवरेव झालेली माझ्या लक्षांत आली. पुष्कळांचीं घरं सुंदर बांधणीचीं असतात, पण त्यांतील सामानाची मांडणी आकर्षक नसते. फर्निचरची निवड सौंदर्यदृष्टीची नसते; नाहींतर स्वच्छतेचें तिथं नांव नसतं. परंतु ही विसंगति इथं नव्हती अन् याचं श्रेय उघड उघड आमच्या शीलावहिनीकडेच द्यायला हवं. त्यांच्या नजरेंत एक प्रकारची तीक्ष्ण चमक होती. घारीसारख्या नजरेनं चहूंकडे त्या निरीक्षण करीत व एकसारख्या आपल्या घरांतील स्वच्छतेबद्दल दक्ष असलेल्या दिसत. किती कौतुक वाटे मला त्यांचं याबद्दल !

आम्ही चहा घेऊं लागलों. कपबशांच्या रंगाशीं किटली, दूधदाणी व साखरदाणीचे रंगच नव्हे, तर डिझाईन देखील सुसंगत होतें. फराळाच्या

छोट्या बशांतून मांडलेले जिन्नसहि मोठे नमुनेदार, कलाकौशल्यानं मांडलेले होते. इतकेंच नव्हे तर त्यांतला प्रत्येक जिन्नस स्वादिष्ट तरी किती होता !

मीं म्हटलं, " वहिनी ! किती छान साधलंय ! कुणीं केलं हें ? "

त्यांच्या घाऱ्या डोळ्यांत अभिमान चकाकूं लागला. त्या म्हणाल्या, " दुसरं कोण करणार ! मीच. यांना आवडणारे सारे जिन्नस मीच स्वतः तयार करतें. सैंपाक्याला जमत नाहीं नीट. "

अभिमानानं मीं दादाकडे पाहिलं. अशी जोड भाग्यवंतावांचून थोडीच इतरांना लाभते ? त्याच्या चेहऱ्यावरहि कौतुकाची भावना दिसेल अशी माझी कल्पना होती. पण काय बाई नवल ! त्याचा चेहरा अधिकच गंभीर झाला होता.

मीं म्हटलंच शेवटीं,

" दादा ! तुझं भाग्य खरंच मोठं, बरं का ! म्हणून शीलावहिनींची तुला जोड मिळाली. "

" तें काय विचारतां ? " दादा उद्गारला व एक दीर्घ श्वास टाकला त्यानं. मी मनाशीं नवल करीत राहिले त्याचें.

दादाला गोजिरवाणीं तीनचार मुलं होतीं. देवानं चंद्रकान्ताला कोणताच कमीपणा ठेवायचा नाहीं असं ठरवलेलं दिसत होतं जणूं. अंथरुणांतून उठून दूध वगैरे घेऊन मुलं बाहेर येऊन आपल्या उत्सुक डोळ्यांनीं माझ्याकडे पाहूं लागलीं. पण दूर भित्र्या सशांप्रमाणें उभीं होतीं. मीं म्हटलें,

" अरुण ! निरू ! जवळ या ना जरा. आत्याबाईला विसरायचं होय असं ? पाहूं, पाहूं. फ्रॉक किती छान शिवला आहे तो ? अरू, घे ना तुला केक. छान आहे. "

प्रथम तर अरूनें चटकन् हात पुढें केला. पण मग त्यानं आईकडे पाहिलं. वहिनींच्या घाऱ्या डोळ्यांची लकाकी अधिकच स्पष्ट झाली होती. त्याची उत्सुकता मावळली. खिन्नपणानं तो म्हणाला, " नको मला. "

" कां रे बाळ ? निरू, तूं तरी घे कीं—"

निरूची चलबिचल होऊं लागली तोंच वहिनी म्हणाल्या,

" अरू ! आठ वाजले. अजून आंघोळ नाहीं तुझी. नाईट सूटमध्ये बाहेर हिंडायचं नाहीं म्हणून हजारदां सांगितलं आहे. हा गलिच्छपणा मला मुळींच आवडत नाहीं. अन् निरू ! अजून साडेनऊला अवकाश आहे. तेव्हां तुला हें सारं मिळेल. उगीच मुलांनीं येतां जातां खाल्लं कीं तब्येत बिघडते. "

बिचारीं दोन्ही मुलं मुकाट्यानं निघून गेलीं. मला किती आश्चर्य वाटलं त्याचं ! आमच्या घरीं मुलांचा खाण्याकरतां हट्ट चाले, गोंधळ चाले तें मला आठवलें. कुणीकडे तो बेशिस्त कारभार अन् कोणीकडे ही अगदीं वक्तशीर जोपासना !

फुलदाणींतून दोन फुलं घसरलीं. शीलावहिनी नीट बसवूं लागल्या. मीं कौतुकानं म्हटलं,

" वहिनी ! तुम्हांला सगळं साधतं तरी कसं ? किती आज्ञेत आहेत मुलं ! किती शांत ! घरसुद्धां किती स्वच्छ. तुमचा संसार आदर्श आहे अगदीं. हजारांत एकाद्याहि घरीं अशी परिपूर्णता दिसत नाहीं. दादा, खरंच, अगदीं आदर्श पत्नी मिळाली आहे तुम्हांला. "

" अगदीं खरं. " दादा उद्गारला. तोहि स्वर मला खिन्नतेचा वाटला. खरं प्रेम असेल, तेथे जोडीदाराची कुणीं स्तुति केली तर आनंदानं मूठभर मांस चढतं जसं. म्हणून हें कोरडं उदास उत्तर ऐकून परत मला आश्चर्य वाटलं. दादाच्या मनाला कसलं शल्य बोचतय ?

" तुझी नवी कादंबरी फारच आवडली मला दादा. संसारांतल्या विसंगतीचं किती भेदक चित्र काढलं आहेस तूं ! इतक्या आनंदी, सुसंगत, सुंदर संसारांत राहून तुम्हीं तें कष्टी चित्र काढलंत तरी कसं ?—"

दादाची मानसकळी खुलूं लागली. विरूं पाहाणारा आनंद जणुं एकदम जमा झाला. आवडता विषय निघाला, कीं मनांत उल्हासाच्या शतधारांचें कारंजें सुरू होतें हा अनुभव कुणाला नाहीं ? मलाहि वाचनाची, वाङ्मयाची फार प्रीति. आमचं बोलणं एकादं चित्र हळूं हळूं रंगत असावं तसं निरनिराळ्या विषयांच्या छटेनं खुलून रंगूं लागलं.

वहिनींनीं कांहीं वेळ मुग्धपणें आमचीं बोलणीं ऐकलीं. मग त्यांनीं उठून टेबलावरच्या विणलेल्या कव्हरला सुरकुत्या पडल्या होत्या त्या नीट केल्या व टेबलावरचे कागद एकदां उगीचच नीट ठेवले. मग त्या म्हणाल्या,

"वन्सं, बसा तुम्ही बोलत. मी जातें आंत, बरं का. काम आहे मला. नऊला चहा करीन हं पुन्हा! अन् बरं का, म्हटलं, दहाला आंघोळीला येणार ना? नाहींतर हीं एकदां पुस्तकांचीं बोलणीं सुरू झालीं कीं समाधि लागते न् व्यवहाराची शुद्धच उरत नाहीं माणसांना मग! म्हणून म्हणतें—"

शेवटचे शब्द अर्थात्च पतीला उद्देशून होते. मग आमचें रंगांत चाललेलें बोलणें एकदम रंग उडालेल्या खेळण्याप्रमाणे फिकें पडलें. व्यवहार विसरण्याचा आरोप पतीबरोबर माझ्यावरही वहिनीनं केला होता नकळत. किती दिवसांनीं भेटलों होतों आम्ही. कितीतरी बोलायचं होतं मला भावाशीं. खुल्या दिलानं त्याच्या पुस्तकांबद्दल मला चर्चा करावीशी वाटत होती. वाङ्मयविषयक यशाचा इतिहास ऐकण्यासाठीं मन आतुरलं होतं. पण त्यासाठीं त्यांची शिस्त मोडणं योग्य नव्हे हें मला पटलं.

दादा म्हणाला, "बरी आठवण केलीस. मी आतांच आंघोळ करून घेतों साऱ्यांआधीं. ताई, शीला नेहमीं अशी सावध करते म्हणून ठीक. नाहींतर कायमची समाधीही लागली असती कीं काय कुणाला ठाऊक मला या व्यवहाराच्या विसराळूपणांत! बरं ताई, दुपारीं बोलूं आपण सावकाशीनं हं!"

आणि भरतीची लाट जशी वेगानं पुढं येते न् लगेच मागें जाते, तशी त्याच्या उल्हासानं माघार घेतली. आनंदानं एवढा वेळ चमकणारे डोळे परत निस्तेज झाले असा मला अगदीं सूक्ष्मसा भास झाला. वहिनीचें तिकडे लक्षही नव्हतं.

दुपारीं मी दादाच्या खोलींत आलें. खालीं मान घालून तो लिहिण्यांत अगदीं गर्क झाला होता. जवळ दुधाचा भरलेला कप तसाच होता, फराळाच्या कांहीं वड्या होत्या, त्यावर माशांचे थवे बसले होते. त्याचें लक्षदेखील नव्हतें. मी आलेली लक्षांत आलं नाहीं त्याच्या!

दादाची खोलीदेखील किती स्वच्छ होती ! खिडक्यांना निळसर पडदे होते. प्रत्येक पुस्तकाला कव्हर घातलेलं दिसत होतें. कपडे खुंटाळ्यावर व्यवस्थित अडकवलेले होते. मीं मनांत म्हटलं, ‘ दादा इतका व्यवस्थित कधींपासून झाला ? मागें पाहावं तर त्याचे कपडे अस्ताव्यस्त असत, टेबलावर पुस्तकें एकमेकांच्या अंगावर पडून असत. अन् आतां पहा ! ही सारी शिस्त वहिनींनीं लावली आहे ! शाबास त्यांची ! ’

मग मला घरची आठवण झाली. आमच्या घरीं मीं शिस्त लावायचा प्रयत्न केला असता तरी कोण ऐकणार होतें ? मला इकडून स्वच्छ सांगणं होत असे कीं माझ्या कागदपत्रांना हात लावूं नका ! मला नाहीं आवडत ! मला वाटलं, अशिक्षित बायको अन् सुशिक्षित बायको यांत हाच मोठा फरक असला पाहिजे. अशिक्षित बायको पतीला धाकांत ठेवूं शकत नाहीं. तेंच वहिनीसारखी सुशिक्षित शिस्तप्रिय पत्नी मिळाली कीं पति तिच्या तंत्रानं वागत असला पाहिजे !

दादाशीं मी कांहीं बोलणार तोंच मागून शब्द आले—

“ म्हटलं, दूध निवून गेलं सारं. अन् त्या वड्या ठेवून तासभर झाला ! काय नादिष्टपणा बाई ! बर्सं, मी नसतें तर दोनदां जेवायचीदेखील आठवण राहिली नसती यांना त्या लिहिण्यापुढें ! आतां शंभर माशा बसलेल्या वड्या खाल्ल्या कीं आजार ठेवलेलाच ! छे छे ! माझा जीव कसा दमून जातो तुमच्यावर लक्ष ठेवतां ठेवतां. मी आहें म्हणून बरं—”

दादाची एकाग्रता भंग पावली. लिहिण्यांतली तन्मयता मोडून गेली. रूक्षपणें त्यानं मागें वळून पाहिलं अन् म्हटलं,

“ मला खरंच आठवण राहात नाहीं कसली लिहितांना. काय करावं ? तूं नसतीस तर बहुतेक मी जिवंत राहिलोंच नसतों ! ”

मग कपाट उघडून त्यानं कोठलंसं पुस्तक काढलं. पण तें काढतांना नेहमींच्या त्याच्या गडबड्या स्वभावानुसार दोनचार इतरही पुस्तकं वेडीं-वांकडीं होऊन खालीं आदळलीं. लगेच वहिनीचा रोष शब्दांत उमटलाच—

" हेंच तें ! कोठलीहि वस्तु कधीं सावकाशपणीं, बेतानं वापरायची माहीतच नाहीं. एक पुस्तकसुद्धां काढून नाहीं का टापटिपीनं घेतां येत ? पाहिलंत ना वन्सं भावाचा स्वभाव ? रोज खोलींत दहादां आवरावं लागतं मला येऊन ! तो पहा सिगरेटचा डबा पडलाच आहे उघडा ! अन् दहा थोटकं पडलीं आहेतच टेबलाखालीं ! लिहितांना इतक्या सिगरेट्स ओढल्या ? काय बाई ! हें काय लिहिणं कां सोंग ! "

दादाच्या कायमच्या प्रसन्नतेचा मार्ग आम्हांला हेवा वाटत होता; पण आज दादाचा तो विमनस्क चेहरा व शून्य नजर पाहून मला बरं वाटलं नाहीं. मीं म्हटलं,

" पण लिहिणं हाच दादाचा आनंद आहे, तोच जीवितव्यवसाय आहे त्याचा. अन् या साऱ्या भाग्याला तुम्ही चढलांत तेंहि दादाच्या लेखन-कुशलतेमुळेच. त्याला सोंग काय म्हणतां तुम्ही वहिनी ? "

वहिनी उपहासानं हंसल्या. त्यांच्या तीक्ष्ण नजरेंतली तीव्रता जणूं उफाळून बाहेर दिसूं लागली. त्या पहाण्यांत तुच्छबुद्धिसुद्धां होती. त्या मर्मभेदी हंसत म्हणाल्या,

" तुम्ही बहीणच. तेव्हां भावाचे दोष तुम्हांला नाहींच दिसायचे. पण मी खऱ्या पत्नीच कर्तव्य सर्व दृष्टीनें करीत असतें ! कर्तव्यदक्ष पत्नी पतीच्या चुका क्षम्य मानून हंसण्यावारी कधींच नेणार नाहीं. ती त्याला निर्दोष करण्यासाठीं धडपडेल ! आतां हेंच पहा ना. लिहीत बसायचं तासच्या तास ! पण रेशन किती आलं, खर्च किती झाला, आपली शिल्लक किती, कपडे किती कसे करावयाचे, कांहींतरी आठवण असते का विचारा ! व्यवहार कशाशीं खातात माहीतसुद्धां नाहीं ! परवां दोन आण्यांच्या वेणीला ८ आणे दिले पट्कन ! टेबलक्लॉथ मुंबईहून परवां बारा रुपयाला आणलं ! मनांत आलं, दिले फेंकून आपले बारा रुपये ! कालच मीं तपास केला, सहा रुपयाला तें मिळतं आहे इथें ! थोडी तरी चौकशी ? जगांतल्या बाजारभावांची कल्पना नको का ? "

दादांच्या अव्यवहार्यतेची जणुं ही चीरफाडच सुरू झाली होती. त्यांच्या प्रसन्नतेनं केव्हांच काळं केलं होतं ! पुस्तकें परत नीट लावून ठेवीत

असलेल्या पत्नीकडे पहात तो शुष्कपणें हंसण्याचा प्रयत्न करून म्हणाला,

" पण ताईला माझे दुर्गुणसुद्धां माहीत आहेतच लहानपणापासून. तेव्हां आतां हा विषय जाऊं द्या झालें! आपल्याला नाहीं व्यवहारांतलं फारसं कळत. कबूल! म्हणून तर तुम्हांला पैसे देऊन टाकतों न् घरचे सर्वाधिकार देतों ना? बरं, तें राहूं द्या. आपण आज फिरायला किंवा सिनेमाला जाऊं. बरं वाटेल ताईला जरा. "

" मला नाहीं जुळायचं. महिला-संस्थेची मीटिंग आहे आज. मला गैरहजर राहून नाहीं चालायचं. "

" पण एक दिवस मीटिंग बुडवली तर?—"

" छे. मीच सेक्रेटरी. मीच शिस्तीची भोक्ती अन् मी कशी गैरहजर राहून शिस्तभंग करूं बरं? पण तुम्ही जाऊन या ना दोघें. रात्रीं जेवायला आज मी पुलावा करणार आहें. वन्सं, पुलावा—अर्थात् शाकाहारी बरं का—यांना फार आवडतो म्हणून मी मुद्दाम शिकलें आहें! तुम्हांला आवडतो ना? तिखट करणार नाहीं फारसा-म्हणजे चालेल तुम्हांला. "

माझ्या ओटांतून शब्द जुलमानं धरून ठेवलेल्या माणसासारखे निसटायला धडपडत होते. ' तुमचा तिखटजाळ पुलावाही आवडेल, पण हा तिखट स्वभाव नाहीं आवडला ' म्हणून म्हणायचं ओटांवर आलं होतें, पण मीं तें आवरलं व माझ्या लक्षांत आलं कीं माझ्या खुषमस्कऱ्या मनानं खुशाल स्तुतीचींच वाक्यें माझ्याकडून उच्चारवलीं मला न कळतां—

" तुमचा हा पाककुशलपणाचा गुण मोठा नमुनेदार आहे बाई. आल्यापासून कित्ती तऱ्हेतऱ्हेचे जिन्नस करतां आहां वहिनी. केव्हां शिकलांत तरी हें सारं?" असलें मी बडबडत असल्याचं आढळून आलें मला.

वहिनीसारख्या गंभीर शिस्तीच्या स्त्रिया उगीच खूप हंसत नाहींत. त्यांनीं आपल्या एकंदर व्यक्तित्वाला साजेल एवढेच अस्फुट स्मित केलें व पतीकडे पाहात त्या उद्गारल्या,

" पतीला जन्मभर आपलंसं करायचं असेल तर त्याच्या आवडीचे जिन्नस करायला शिकलंच पाहिजे पत्नीनं! बरं, साडेतीन होत आले.

आपण चारला निघणार ना ? करडा सूट काढून ठेवूं ? फारच अपटुडेट दिसतो तो—"

"तुला हवा तो ठेव. मी कपड्यांचें कधींच कौतुक नाहीं मानलें. आतांच काय !"

"आज कसलीतरी सुटी आहे." म्हणून आनंदानें मुलें धांवत येऊन सांगूं लागलीं. निरूला मीं विचारलें,

"बाई कशा आहेत ग तुझ्या ?"

निरूच्या चेहऱ्यावर आनंदाच्या छटा उमटल्या. ती हंसून म्हणाली, "आत्याबाई ! आमच्या बाईंचें आडनांव भोपळे आहे अन् म्हणून आम्ही भोपळ्याबाई म्हणतों त्यांना ! कित्ती लठ्ठ आहेत त्या. त्यांना भराभर चालतां येत नाहीं. 'भूगोल' देखील म्हणतात मुली त्यांना." अन् ती हंसली. मींहि हंसून म्हटलें,

"वा ! गम्मतच दिसते."

तोंच वहिनींचा करुद्ध स्वर आला—

"बाईंची थट्टा करायची नाहीं ! कितीदां सांगतें तरी पुन्हां तुझें तेंच ! तुझ्या पूज्य शिक्षकीणबाई त्या—आणि—"

"हो ! मोठ्या आल्या आहेत पूज्य ! सारख्या छड्या मारतात. अन् म्हणे..." रागानें निरू पुटपुटूं लागली.

वहिनींच्या डोळ्यांतली उग्रता चकाकून दिसली. त्या म्हणाल्या,

"पण मोटीं माणसें बसलीं असतांना तेथें बसायचें नाहीं म्हणून हजारदां सांगितलेलें आहे ना ? तुमच्या खोलींत जा ! कपडे बदला. तोंड धुवा स्वच्छ, खायला बसा. चला इथून."

अरूला थोडी अधिक समजूत आली होती. तो म्हणाला,

"आम्ही नेहमीं नाहींच बसत मोठ्या माणसांत. पण आत्या आली आहे म्हणून बसावेंसं वाटतें जरा गोष्टी ऐकत. कपडे मग बदलले तर काय झालें ? बाबा, बसूं का हो ?"

" छे ! तें कांहीं नाहीं. एकदां गलिच्छ संवयी लागल्या कीं लागल्या. ऊठ अरू ! कसल्या ऐकतां मोठ्यांच्या गोष्टी ? निरू, बाबांकडे पहायचं कारण नाहीं. चल. "

मुलं कपाळाला आंठी घालूनच उठलीं व मोठ्या नाखुषीनं आंत निघून गेलीं. विषय बदलण्यासाठीं मीं पलीकडच्या कांचेच्या कपाटाशीं जात म्हटलं,

" वहिनी, कित्ती हीं सुंदर खेळणीं ! बाहुल्यादेखील किती कोऱ्या आहेत ! बरी तुझी मुलगी मळवीत नाहीं खेळ. आमच्या घरांत पहा एकदां ! खेळणं एकहि चांगलं म्हणून रहात नाहीं. आणल्याबरोबर मुलं मोडूनतोडून पार करतात. "

वहिनी शांतपणें म्हणाल्या,

" तसं मला नाहीं आवडत. मी जपून ठेवतें. देत नाहीं सारखीं निरूला काढून ! तुम्हीच पहा, चार चार रुपये नासून मोटारी, विमानं इतकालीं आणायचीं, भावल्यांना तर सात सात रुपये पडले आहेत ह्या ! अन् दुसरे दिवशीं फोडूनतोडून टाकणं म्हणजे काय ? आपणच या बाबतींत शिस्त लावावी लागते वन्सं ! "

उपरोधिक स्वरांत दादा म्हणाले,

" तूंही ही शिस्त शिकून जा ताई इथून. मुलांना खेळ आणला कीं दुरून पहायला शिकव. एका छान कपाटांत ती गौरीची आरास लोकांना दाखवायला मांडून ठेव ! अन् त्यांच्या आनंदाच्या वस्तु तूं अशा कुलूप घालून ठेव. "

मीं जरा बारीक नजरेनं पाहिलं तों कपाटाला अंगचं छोटं कुलूप आहे असं मला दिसून आलं.

वहिनी गंभीरपणें पहात म्हणाल्या,

" मला समजतो असल्या बोलण्याचा अर्थ. पण शिस्तीच्या बाबतींत मुलांचे लाड उपयोगी नसतात. या बाबतींत तुमचीं मतं मला कधींच पटणार नाहींत. बरं, तें असो. वन्सं, कपडे करा तुम्ही. सिनेमाला जाऊन या—"

" अरूनिरूला नेऊं का ? तूंहि बाहेर जाणार आहेस वहिनी, अन् त्यांनाहि सुटी आहे. कंटाळतील तीं—"

वहिनीनीं उत्तर दिलं,

" छे ! लहानपणीं सिनेमा दाखवण्यानं मनावर अनिष्ट संस्कार होतात. चौदा वर्षं मुलांना सिनेमासारख्या शृंगारप्रसारक करमणुकीपासून दूर ठेवलंच पाहिजे."

मी चिकाटीनं म्हटलं,

" पण सारेच कांहीं तसे नसतात बोलपट. आम्ही एकाद्या सात्त्विक चित्रपटाला जातों. 'जंगल बुक' ही चांगली धाडसाची हकीकत आहे. 'माळी'ही चांगला आहे तसा. मग..."

" पण नकोच ! त्यांना सर्कसलाच पाठवीन मी पांचाला आज दादू गड्याबरोबर ! म्हणजे झालं. सिनेमा नाहीं म्हणजे नाहीं !"

मोटारींत बसतांना खिडकींतून अरू-निरूचे म्लान चेहरे आमच्याकडे पहात होते. निरूच्या डोळ्यांत तर पाणीहि लकाकतंय असं मला भासलं. अरू ओठ घट्ट दाबून या 'अन्यायाचा' सूड कसा घ्यावा याचा विचार करतो आहे असें माझ्या मनांत आलं. मला राहवेना. मीं म्हटलं,

" दादा ! मुलं फारच कष्टी झालीं बाबा. आपण नसतों आलों तर बरं झालं असतं. नाहीं ?"

दादा म्हणाला,

" आणि तूं पहिल्यानं मला भाग्यवान् म्हणाली होतीस आल्याबरोबर ! तूंच काय ? प्रत्येक मनुष्य म्हणतो तसं. आतांहि तुझं मत तेंच कायम आहे का ? आतां कळलं ना मी 'विसंगतीचीं कथानकं' कशीं रचतों तें ?"

मीं म्हटलं, " त्यांच्या शिस्तीबद्दल म्हणतोस वाटतं तूं ?"

उदास होऊन दादा उद्गारला,

" तिची शिस्त चांगलीच आहे. पण कोठलाहि सद्गुण अति झाला, कीं दुर्गुण होऊं शकतो. सर्कशींतल्या जनावरांना चाबूक मारून जसा रिंगमास्तर खेळवतो तसा प्रकार पाहिलास ना घरचा ? असं वाटतं, एवढं घर तिनं स्वच्छ ठेवलं नसतं तरी चाललं असतं; पण थोडा प्रेमळ, खेळकर, विनोदी स्वभाव, थोडी सौम्य भाषा असती तर मी अधिक सुखी झालों असतों—मुलं थोडींतरी आनंदित झालीं असतीं."

" मग सांगत कां नाहीं तसं एकदां खेळीमेळीनं तुम्ही ! "

" खेळीमेळीचं वागणं या घरांत शक्य नाहीं हीच तर माझी मोठी तक्रार आहे. अन् सांगून उपयोग तरी काय ? या शिस्तीच्या वागणुकींत आणखी अबोला न् राग यांचीच मिळवणी व्हायची ना ? मला तें औपचारिक वातावरण तर एक दिवसही नाहीं सोसत. मग-जाऊंदे झालं...सारं. बंगला सुंदर आहे तरी त्याला एक तडा दिसला ना तुला ? एवढ्या मजबूत भिंतींतही ओल मुरून तो नकळत पडलाच ! तसंच सुखाच्या राशींत असे कांटेही असायचेच लपलेले ! चालायचंच—"

सिनेमागृहाशीं मोठी पाटी लागली होती,

" न दिसणारे कांटे ! "

तिकडे पहात लेखक चंद्रकांत म्लानपणें हंसून म्हणाला,

" न दिसणारे कांटे...! खरंच ! लोकांना आमचा फुलासारखा संसार फुललेला, बहराला आलेला तेवढा दिसतो. पण हे न दिसणारे कांटे लहान असले तरी मला क्षणोक्षणीं कसे लागतात ते ! व्यवहार नसला तरी मला भावना आहेतच. त्यांना घडीघटकेला कसे ओरखडे निघतात तें तुझ्या लक्षांत आलं ना ? "

मी थोडा वेळ स्तब्ध होतें. मग म्हटलं,

" असा माणसांत एकादा लहानसा दोष असायचाच ! संभाळून घेतलं पाहिजे दोघांनीं संसारांत ! "

मी हें बोलत होतें खरी, पण माझं मन कुरकुरत म्हणत होतं, ' उगीच कशाला वहिनीची बाजू घेतेस ? हा दोष लहानसा आहे काय ? अन् दोघांनीं संभाळून घ्यायचं तर वहिनींनींच कां थोडं संभाळून घेऊं नये ? खेळीमेळीनं वागूं नये का त्यांनींहि ? '

आणि मनाच्या या प्रश्नांना—समर्पक उलटतपासणीला कोण टिकणार आणि वहिनींना त्यांचे दोष दाखवण्याचं धैर्य कुणाला होणार हाच कठीण प्रश्न नाहीं का एक ?